श्री.



महाराष्ट्रकाव्यग्रंथ.

१३.



शिवरामकृत.

# शिवकथामृत.

विनायक लक्ष्मण भावे, बी. एस्सी;

यांनीं

'महाराष्ट्रकवि' या मासिक पुस्तकांत छापून प्रसिद्ध केला.

---

शके १८२९.

सन १९०७

# शिवकथामृत.

मन्मनोऽविकारं चेद्विघ्नध्वांतदिवाकरः ।
उमापतिः सहायश्चेन्मामयं किं करिष्यति ॥ १ ॥
नमः शिवाय नित्याय समस्तगुणवृत्तये ।
ज्योतिर्मात्रस्वरूपाय निर्मलज्ञानरूपिणे ॥ २ ॥

ॐ नमो जी शिवा सनातना, । समस्तगुणवृत्तिचेतना, । ज्योतिर्मया, आनंदघना; । निर्मळज्ञानस्वरूपा. ॥ १ ॥ बोधचंद्र साजे शिशीं, । दया, क्षमा, चामरीं शोभसी, । त्रैलोक्यनगरारंभासि । मूळस्तंभ होसी, श्रीशंभो. ॥ २ ॥ गणेश, भारती, विधि, हरि, । तूं साजसी यिये अळंकारीं; । एकरूप नटसी चराचरीं, । निर्विकारी निजांगें. ॥ ३ ॥ आतां माझें हृदयीं बसावें, । तुझ्या शिवकथेसि पुरवावें, । स्फूर्ति स्फुरविता आववें । होऊनि स्फुरावें मन्मुखीं. ॥ ४ ॥ ऐकोनि ऐसी प्रेमबोली । पूर्णानंदे चंद्रमौळी. । शिवकथारूपें तेचि काळीं । स्फुरली वाग्वल्ली अनिवार. ॥ ५ ॥ ते कथा नैमिषारण्यीं । ऋषेश्वरां सांगत सूत मुनि. । ऋषि सकळ पुसती मिळोनि । सूतालागूनि तें ऐका. ॥ ६ ॥ "सूता, तुझेनि प्रभावें । विष्णुमाहात्म्य ऐकिलें बरवें; । आतां शिवमहिमान सांगावें । कृपावैभवें आम्हांसि. ॥ ७ ॥ शिवभक्ताचें महिमान, । मंत्रसामर्थ्य, व्रतविधान, । कथा आणि शिवपूजन । आम्हांलागोनि बोलावें." ॥ ८ ॥ ऐकोनि ऋषींचें वचन, । सूत आनंदला संपूर्ण. । "धन्य हें तुमचें प्रेमलक्षण । शंकरीं पूर्ण प्रगटलें. ॥ ९ ॥ वाम, सव्य, उभय उभारा । मिळोनि देखिजे येक्या शरीरा; । तैसें विष्णु आणि शंकरा । भेदपसारा पैं नाहीं. ॥ १० ॥ परब्रह्म जें येकलें, । तेंचि प्रकृतिपुरुषत्वें बोलिलें, । प्रकृतित्व विष्णूसि शोभलें, । शिवा आलें पुरुषत्व ॥ ११ ॥ पावोनि प्रकृतिपुरुषांचें अंग, । चिद्रूपत्वें स्वयें अभंग, । जेंवि अर्धनारीनटाचें सोंग । धरितां चांग निर्विकारी. ॥ १२ ॥ त्या शिवाचे कथेविषयीं । प्रेम संचरलें तुमचें कांहीं; । तरी तें शिवमहिमान समग्रही । सामर्थ्य नाहीं मज वदावया. ॥ १३ ॥

त्यांत कांहीं येक किंचित कळे । हृदयस्थ शिवाचेनि कृपाबळें, । तें तुह्मां सांगेन निश्चळें । सुखसोहळे भोगित. ॥ १४ ॥ सर्व मंत्राचा शिरोमणि, । जपयज्ञाची मूळखाणी, । ते हे शिवपंचाक्षरयजनीं । समस्तीं मुनीं वाखाणिजे. ॥ १५ ॥ सच्चिदानंद शिवमूर्ति । गम्य होय ज्या मंत्रार्थीं, । त्या शिवपंचाक्षराची महती । ऋषीं समस्तीं जाणिजे. ॥ १६ ॥ महावाक्या शोधूं बसतां । लाभे जीवेश्वरा ऐक्यता; । यथा 'ॐ नमः शिवाय' । ऐसें ह्मणतां। जीव तत्वता शिव होये. ॥ १७ ॥ सहज 'ॐ नमः शिवाय' । हा मंत्र राहे हृदयीं जया, । त्यास येर साधनें कासया । शिव जालिया निजांगें? ॥ १८ ॥ प्रणवावांचोनि मंत्रोच्चार । करिती स्त्री शूद्र हो कां पां नर, । तिहीं जाळूनि अविद्यानगर । मोक्षमंदिर पावती. ॥ १९ ॥ अविद्या-सिंधूचा वोणवा, । कीं मोक्षमार्गाचा हा दिवा, । हा शिवपंचाक्षर मंत्र बरवा, । वाखाणावा काय ह्मणौनि? ॥ २० ॥ ह्मणौनि भवार्णव तरावया । शरण जाऊनि सद्गुरुराया, । ध्यावें तेथें मंत्रराजया । क्षेत्रीं बरवया जपावा ॥ २१ ॥ प्रयाग आणि पुष्कर, । शतबंध, केदार, । नैमिषारण्य, गोकर्ण-क्षेत्र । जाण पवित्र हीं स्थानें. ॥ २२ ॥ या पंचाक्षरीप्रतापें । कोण उद्ध-रिला साक्षेपें? । ते कथा सांगेन संक्षेपें । साधन सोपें मुमुक्षां. ॥ २३ ॥ यादवांचा मुकुटमणि । मथुरेमाजी राजा कोणी । दाशार्हनामें विख्यात जनीं । उत्सवदिनमणि सकळांचा. ॥ २४ ॥ महारथी, महाशूर, । नाना शास्त्रार्थीं चतुर, । दाता, लावण्याचा आगर, । लक्षणीं समग्र लक्षितु. ॥ २५ ॥ काशिराजयाची कुमरी, । नामें कळावती सुंदरी, । रूप लावण्य सना-गरी, । तेणें स्वयंवरीं वरियेला. ॥ २६ ॥ संपवूनि लग्नसोहळा, । राजा निजमंदिरा आला; । तिसीं भोगावया कामकळा । पाचारूं तिला धाडिलें. ॥ २७ ॥ स्वपतिचेनि संदेशीं । बहुधा प्रार्थिलें निरोसि; । तो बोलाचि न धरी मानसीं, । कीं त्यापासीं न जाये. ॥ २८ ॥ वल्लभा नये शेजेसि, । ह्मणूनि स्वयेंचि आला तीपासीं; बळें झोंबावें जों तियेसि, । तों ते पतीसि बोलत. ॥ २९ ॥

'राया बळात्कार करूं नको, हो. । व्रतस्थ मी; कारण जाणता हो. ।
तूं जाणसी धर्म, अधर्म वोजा; । ह्मणीं करीं साह्यासि आजि माझ्या. ॥ १ ॥

प्रति प्रियेसीं, रमणी प्रियासीं । सस्नेह जेव्हां, रमणें सुखेंसीं. ।
आम्हां तुम्हां संगम तो प्रितीचा; । प्रीतीविना कामविलास काचा? ॥ २ ॥
हा पाहिजे होइल संग जेव्हां, । घडो तुझा संगमयोग तेव्हां. ।
रतीविना येथ कलत्रभोगें । येणें तुला तें सुख काय? सांगें. ॥ ३ ॥
जे अप्रिया, योगरता, व्रतस्था, । गुरूदरा, केवळ वृद्ध कांता, ।
निःकाम अत्यंत, रजस्वला हो । बळें करीतां रति शुद्ध नाहो.' ॥ ४ ॥

यापरी तिणें बोधिला जरी, । स्मरें चेतविला अंतरीं. । रायें बळात्कारें ते सुंदरी । क्रीडाविकारीं आलिंगिली. ॥ ३० ॥ रायें कवळितां, ते महिला । गमली तप्तलोहाचा गोळा. ॥ सर्वांगा झोंबती ज्वाळा, । त्याग केला बहु भेणें. ॥ ३१ ॥ तंव तीस बोलूं पाहे, । 'केव्हडें आश्चर्य जालें, प्रिये? । पल्लवकोमळ तुझ्या काये । स्पर्शितां दाहें पोळलों.' ॥ ३२ ॥

पद.—( धाटि. ग्यां रावणानें—राग धनाश्रि. )

देखुनि त्याची ये चर्या, । हासिन्नली ते नृप जाया; ।
बोले पतीसीं सावध करूनियां ॥ १ ॥ 'तूं ऐक, राया; ॥ ध्रु० ॥
माहेरीं होतें मीं सानीं; । दुर्वासानें येउनी, ।
मंत्र शिवाचा कथिला मज कानीं. ॥ २ ॥
शिवमंत्रावृत्ति मज घडली, । माझी काया शिव जाली. ।
शिव विन्मुखीं केविं जाइल आकळिली. ॥ ३ ॥
सेवित मदिरा मोहेसीं । कुलटा, गणिका; अघराशी; ।
संग घडेगा ऐशांचा तुजसीं. ॥ ४ ॥
शिवराम प्रभु सुखराशी । पूर्ण मनें स्मरलासी, ।
तो तूं मातें कैसा आतळशी?' ॥ ५ ॥

राजा म्हणे, 'सुश्रोणि, । तो मंत्र सांग, वो, मजलागूनि; । या विद्येनें दोष क्षाळूनि । तुजसीं अनुदिनीं मी नांदें. ' ॥ ३३ ॥ कलावती म्हणे सादर, । 'मज बोधाया नाहीं अधिकार. । तूं माझा निजभर्तार, । गुरु साचार तूंचि मज. ॥ ३४ ॥ तुझ्या वंशाचा कुळगुरु, । गर्गाचार्य प्रसिद्ध, थोरु; । तो तुम्हां उपदेशी द्विजवरु । पंचाक्षरविधीनें.' ॥ ३५ ॥ ऐसें बोलोनि दंपती । गेली गर्गाचार्याप्रति. । पायां लोटांगणें घालिती, । भावें

प्रार्थिती कृतांजुळी. ॥ ३६ ॥ राजा म्हणे, ‘ कृपासागरा, । कृतार्थ करी मज पामरा. । कृपेनें मंत्र षडक्षरा । मज, उदारा, उपदेशी. ॥ ३७ ॥ राजकर्माच्या प्रवृत्तीं । जे जे दोष म्यां केले असती, । तीं पातकें जेणें नाशती, । तो मंत्रमूर्ति मज द्यावा.’ ॥ ३८ ॥ ऐसी ऐकतां त्याची गिरा, । आनंद जाला द्विजवरा. । त्या कलावतीनृपवरा । यमुनातीरा पैं नेलें. ॥ ३९ ॥ उभा बिल्ववृक्षातळीं, । रायासि स्नान घातलें जळीं. । बैसाविला आपणाजवळी, । चंद्रमौळी चिंतिला. ॥ ४० ॥ पूर्वें बैसला गर्गाचारी, । सांब ध्यायिला अंतरीं, । हात ठेविला मस्तकावरीं, । मंत्र श्रोतीं फुंकिला. ॥ ४१ ॥ हस्तिमस्तकाच्या कुतूहळें, । शिवमंत्र धारणे-चेनि बळें, । त्याच्या देहांतूनि तेचि वेळे । निघाले काउळे कोट्यावधि. ॥ ४२ ॥ ते पक्षी जळाले असती, । उडउडोनि सर्वेचि पडती. । भस्म होऊनी पडले असती, । देखे नृपती सहस्रशा. ॥ ४३ ॥ तो काउळ्यांचा समुदावो । देखतां ठकावला रावो. । वंदोनि गर्गाचे दिव्य पावो, । दोघे अभिप्रावो पूसती. ॥ ४४ ॥ ‘ आश्चर्य मोठें, गुरुवर्या; । माझ्या रोमरंध्रा-हूनियां । काकसमुदावो निघावया । हेतु, मुनिराया, तो काये ’? ॥ ४५ ॥

## पद.

गर्गमुनी मग बोलत, ‘राया, ऐक रहस्य बरवें । मागील जन्मीं अनेक पापकुळ मोह महातिमिरें; । आचरलासी, तशीं सुकृतें बहु राहाटलासी, रे, । पापपुण्य समते तुकल्यां सवें आलासी या शरीरें. ॥ १ ॥ राया, धन्य तुझी मती पुण्यरूपतरू मोक्षफळीं फळला; । पंचाक्षर शिवमंत्र महावन भाग्य-बळें वळला. । शैवषडक्षरदारुणमंत्रमहाग्निशिखा प्रबळे; । कर्णबिळें हृदयांत शिरोनि धगधगीत प्रज्वळे. । तैं न सहाती अघसमुदाये, ते काक-रूपें सगळे । बाहिर ते पडले जळोनि; आतां चित्त तुझें विवळे. ॥ २ ॥ शैवनिदिध्यसनें दिनयामिनि विस्मरसी विषयां; । अंतर बाहिर होसिल तूं शिव; जाइल दृश्य लया. । पूर्णसुखार्णव पूर भरे; कोण लेखित जन्म-लया, । आत्मसुखें शिवरामरूपिं रस ग्रासुनि जीवभया?’ ॥ ३ ॥

यापरी बोलोनि रायाप्रति, । स्वगृहा चालिली सदंपती. । मग गर्गासि वंदूनि परम प्रीती । दोघें निघती निजनगरा. ॥ ४६ ॥

येऊनि आपुल्या निजसदना, । रायें आलिंगोनि निजांगना, । पूर्णानंद पावला, जाणा, । गमनागमना विसरोनि. ॥ ४७ ॥ ऐसा **शिव**पंचाक्षरिप्रभावो, । ऋषेश्वरां सांगतां **सू**तदेवो, । तो विसरोनि गेला देहभावो, । **म**हादेवो कोंदाटला. ॥ ४८ ॥ **स्कंद**पुराणींच्या आपाडीं, । कथा आहे **ब्रह्मोत्तरखंडीं**; । पाल्हाळ ऐकोनि निज निवाडी । कथाचि आवडी बोलिलों. ॥ ४९ ॥ **नारायणा** शरण जातां, । चरणींचा तो आमोद घेतां, । त्या सुखें स्फुरली **शि**वकथा. । श्रोता, वक्ता **शि**वरावो. ॥ ५० ॥ हा बळात्कार लक्ष्मीपतीचा, । तोचि कर्ता जाला कवित्वाचा. । चेववूनि **शिवराम**वाचा, । रची सुखाच्या ग्रंथातें. ॥ ५१ ॥ इति श्री**ब्र**ह्मोत्तरखंडी । वर्णिली पंचाक्षराची प्रौढी । श्रोत्यांनीं चाखिजे निवाडी । चवी गाढी प्रेमाची. ॥ ५२ ॥

**इति श्रीब्रह्मोत्तरखंडे पंचाक्षरिप्रभाववर्णनं नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥**

---

## ॥ श्री सांबायनमः ॥

श्रोतां व्हावें सावधान, । आणिकही **शि**वमहिमा सांगेन; । जयाचें घडतां श्रवण । संशयच्छेदन होऊनि सरे. ॥ १ ॥ या **शि**वभजनावांचूनि आणिक, । पापाचें नाहीं शोधक, । जें सर्वानंददायक । चहूंही साधक पुरुषार्थां. ॥ २ ॥ हेंचि जाण परम श्रेय. । हाचि सकळ शास्त्रांचा निश्चय. । जें **शि**वभजनीं प्रेम अतिशय । परमोदय मोक्षाचा. ॥ ३ ॥ जाणतां किंवा नेणतां, । भलत्या हेतूनें तत्वता, । जें कांहीं अर्पणें भूतनाथा । तें मुक्तिपंथा भातुकें. ॥ ४ ॥ **मा**घींची कृष्णचतुर्दशी, । तेथें उपवास घडे प्राण्यांसि, । त्यांतही जागरणाचि निशेसी । **शि**वकीर्तनेंसीं दुर्लभ. ॥ ५ ॥ यापरी सुदुर्लभ, जाण, । आत्म**शि**वलिंगाचें दर्शन; । तेथें अत्यंतही अघटण । **शि**वलिंगपूजन स्वानंदें. ॥ ६ ॥ जन्मजन्मांतरींचीं अपरिमिति । पुण्यें फळासि आलीं असती, । तरी बिल्वार्चन घडे निश्चितीं, । जेणें **पशु**पति संतुष्ट. ॥ ७ ॥ युगायुगींच्या पुण्य संतति । जितुक्या बोलिल्या असती, । ते ते **मा**घचतुर्दशी तिथि । प्रतीक्षा करिती बरव्या. ॥ ८ ॥ **ब्र**ह्मादिक सुरवर, । **व**शिष्टादि मुनीश्वर, । **मा**घींची

वर्णिती सादर । चतुर्दशी थोर म्हणोनि. ॥ ९ ॥ तेथें उपवास वडे जरी । शतक्रतूच त्यासि वरी; । जागरण घडलिया शर्वरी, । तपाचें करी कल्पकोटी. ॥ १० ॥ येकेंचि बिल्वें शिवपूजन, । येकेचि निशीं शिवजागरण । करितां, येकचि शिव आपण । स्वयें प्रसन्न तयासि. ॥११॥ जयाचे निशे भक्त जागती, । विषयां अभावें उपवास करिती, । त्रिगुण बेल शिवा अर्पिती । ते देह्याचि लुटिती शिवपद. ॥ १२ ॥ येचि विषयीं नामें धर्में । सांगों इतिहास संभ्रमें; । त्यांत गुप्तही गौतमें । पूर्ण प्रेमेंकरूनि. ॥ १३ ॥ इक्ष्वाकुवंशीं श्रीमंत । राजा परमधर्म मूर्त, । मित्रसह नामें विख्यात । राजयां समस्त भय ज्याचें. ॥ १४ ॥ तो राजा सकळ शास्त्रज्ञ, । श्रुतिअर्थीं परायण, । वीर्यें शौर्यें बळवान, । दयेचा पूर्ण सागर. ॥ १५ ॥ पुण्याचा नेणों गिरिवर, । कां तेजाचा निजपंजर; । आश्चर्याचें जाणों क्षेत्र । ज्याचें शरीर शोभत. ॥ १६ ॥ हृदय दयेचें भरींव; । शरीरीं झमके लक्ष्मी-वैभव; । राजमुकुटांचे समुदाव । लोळति सर्व ज्याचरणीं. ॥ १७ ॥ तों कोणे येके वेळेसि. । राजा गेला पारधीसि; । चतुर्विधही दळभारेसीं । येक्या वनासि प्रवेशला. ॥ १८ ॥ धनुष्या सज्जूनियां शर, । सिंह, शार्दूळ, वनचर, । रुरु, वराह, समग्र । मृग अपार विंधिले. ॥ १९ ॥ सर्वे सारथी चतुर, । वनीं करित विहार, । कोणी येक ज्वलनाकार । निशाचर मारिला. ॥ २० ॥ त्या त्याचा देखोनि घात, । बंधु तयाचा चिंताग्रस्त. । ह्मणे, " कपटें करावा याचा निःपात; । दुसरा अर्थ दिसेना. " ॥ २१ ॥

यापरि चिंतुनि, राक्षस तो मग मानव होउनि त्याप्रति आला, ।
देखुनियां नमुनी द्विज तो मग पाकक्रियसकळाधिप केला. ।
तो नृपनाथ कितेक दिवसांवरि आपुलिया नगरासि निघाला; ।
पट्टसती मदयंति सर्वे सुखरूपचि तो राहता मग झाला. ॥ १ ॥
कोणि येके दिनिं पितृवासर जाणुनि, भूप वशिष्ठगृहाप्रति आला; ।
प्रार्थुनि आणुनियां भुवनासी, विधिवत भुक्तिस तो बसवीला. ।
ते समयीं नरमांस पुढें परिवेशुनि दानव तो मग गेला. ।
म्हणे शिवराम, वशिष्ठ विलोकुनि शापविषी उभारुनि ठेला. ॥ २ ॥
" रे कपटी, नरमांस तुवांपण वाढविलें पचऊनि आह्मांसी; ।

धिग् धिग् जन्म तुझा, पतिता. मर याच अघें जनिं राक्षस होसी." ।
अविचारित शापुनि, जाणुनियां पाहतां, ह्मणे "व्यर्थचि शाप ययासी ।
दिधला, शिवराम करी नियमावधि शाप दहावारि दोनच वर्षे." ॥ ३ ॥
ह्मणे नृप, "मत्करणीच नव्हे, मज शापि वृथा, मिहि शापिन यासी." ।
बोलुनि, शापजळेंसि उठी; तंव वारियलें सतिनें मग त्यासी. ।
स्त्रीवचनें शमला, मग शापजळ त्यजितां पडिलें पददेशीं. ।
कल्मष अंघ्रि, ह्मणौनि निशाचर तो जाहला नृप त्याच घडीसी. ॥ ४ ॥
होउनि राक्षस त्या वचनीं मनुजादिक भक्षित पर्यटतु. ।
तंव तेथें लहान वयें मुनिदंपति देखुनियां पुरुषासि हरीतु. ।
प्राणपती हरितां तिसि दुःखहुताश धडाडुनि सांठवतु. ।
ते विनवीत तयासि कशी, शिवराम तुह्मां परिसा ह्मणतु. ॥ ५ ॥

पद ( राग—जोगी ).

"दे पतिदान, राया. । पडतें पायां. ॥ ध्रु० ॥ बा, तूं परिसीं, राक्षस नव्हेसि, कां करिसी पापासी । दिनकरवंशीं नृप आहेसी रक्षक तूं शरणांसी ॥ १ ॥ भर्ता नाहीं तरि या देहीं जिणें तें मग काई? । वरधनि ठायीं मज पाहतांही ऐसा चतुरचि नाहीं. ॥ २ ॥ मीं द्विजपत्नी तुजलागुनि काकुळती, दिनवाणी, ॥ आजिचे मरणीं अमृतपानीं जीववीं मज पतिदानीं. ॥ ३ ॥ पूर्ण मनेसीं प्रिय जरि देशी शिवरामप्रभु होशी. ॥ त्यजुनि पतीसी वांचूं कैसी अनाथ मीं परदेशीं?" ॥ ४ ॥

ऐसा बोधिलाही तिणें, । त्या निर्दयास तें न मानें; । ती देखतां त्या दैत्यानें । शिर तोडोनि खादलें. ॥ २२ ॥ मग ते मुनीची महासती, । पतिदुःखें करी खंती; । उरल्या सांचूनि त्याच्या अस्थि, । चिता रचिती ते झाली. ॥ २३ ॥ चितीं रिघोनि पतिसरिशी, । ह्मणे, "राक्षसारे, पापराशी; । जेव्हां तूं रे, स्त्रीसंगा वससी, ॥ मृत्यु पावसी तत्काळ." ॥ २४ ॥ ऐसा देऊनि शाप दारुण, । आपण केलें अग्निप्रवेशन; । तो राजाही शाप भोगुन । आपले भुवना पावला. ॥ २५ ॥ शापावधि जालियावरी, । शोभला राजा दिव्य शरीरीं; । अभिषेचिला नृपासनावरी । ऋषेश्वरीं मिळोनि. ॥ २६ ॥ सती-

शाप कळला मदयंतीसी. । रायें येतां रतिसंगासी, ॥ मदयंती निवारी पतीसीं। वैधव्यासि भिऊनि. ॥ २७ ॥ संततीविण राज्यभोगीं, । राजा जाला अति वीतरागी; । सर्व संपदा टाकूनि वेगीं । तपालागीं चालिला. ॥ २८ ॥ राजा गेलिया वना, । वशिष्ठें विचारूनि, जाणा, । कोणी नाहीं राज्यासना, । तयें पुत्रदाना दीधलें. ॥ २९ ॥ येरीकडे राजा आपण, । करूं लागला भूपर्यटन; । ब्रह्महत्या पिशाच होऊन । मागमागुनि लागली. ॥ ३० ॥ ते मुनिपुत्राची ब्रह्महत्या, । विद्वन्मुखीं जाणुनियां, । तें अरिष्ट निरसावया । यात्राचर्या मांडली. ॥ ३१ ॥ नाना क्षेत्रांसि फिरला, । अनेकही तीर्थीं नाहला; । परि, हत्याही ते न सोडी त्याला । मग॰ पातला मिथिलेसी. ॥ ३२ ॥ तेथील बाह्य उपवनीं, । उभा व्यापला चिंतेनीं; । तों ते वेळे गौतममुनि । रायें दुरूनी देखिला. ॥ ३३ ॥ स्वयंप्रकाश जैसा वन्हि, । तपस्वी सेविती भावेंकरूनि; । सबाह्य जैसा दिनमणि । घोटि यामिनी निजतेजें; ॥ ३४ ॥ ज्याचा गुणसुधाकर, । निववी सकळांचें अंतर, । नेणो द्विजराज कळाधर । महेश्वर काय आला ? ॥ ३५ ॥ ऐसा गौतम तेजोराशि । देखोनि शिष्यपरिवारेंसी, । राजा वंदीं साष्टांगेंसी । घडिघडीसी सप्रेमें. ॥ ३६ ॥ गौतमही स्वानंदें आपण, । राजा रविवंशींचा जाणोन, । प्रेमें तयासी आश्वासून । काय वचन बोलिला?॥३७॥

“ सकल कुशल, राया, संपदा ते असे कीं, ।
कुशळ निजप्रजा कीं वर्ततांही विवेकीं, ।
त्यजुनि सकळ लक्ष्मी येथ आलासि कां, गा ? ।
विमन दिससि; कोण्या चिंतिसी कार्यभागा ?” ॥ १ ॥

उश्वास घालुनि, वदे नृप गौतमासी, ।
“तुझ्या कृपेनें, वद, काय उणें अम्हांसी ? ।
आह्मी, नृप प्रगट उत्तम सूर्यवंशीं, ।
तुह्मीं दिल्याच विभवीं असतों सुखेंसीं. ॥ २ ॥

पण दुष्ट पिशाचक हे मज बाधित फार पदोंपदीं भर्त्सित येतें; ।
प्रायश्चित्त सहस्रही केलें क्षणभरिही जवळूनि न जातें. ।

शाप शरीर वसे घडलें मज नेणो अघसंचित होतें ? ।
फार व्रतें तप आचरलों, पण कांहि न सोडि महाग्रह मातें. ॥ ३ ॥

कितेक त्या सरित्सरांत नित्य नित्य नाहलों; ।
कितेक क्षेत्रदैवतें घरेघरेसि हिंडलों, ।
कितेक मंत्रयुक्त देव ध्याइले मनांतरीं; ।
तथापि हें मला पिशाच्च सोडिना घडीभरी. ॥ ४ ॥

आजि मानवी तनू तरूफळीं उदेद्रला, ।
धरणीवरी विलोकिलें तुझ्या अपूर्व पाउला; ।
ह्मणौनि पुण्यसंचयें तुझ्या पदें विसावता ।
सुखार्णवांत जीव हा भरूनि (कीं) दाटला अतां. ॥ ५ ॥

कोठूनि येणें जहालें दयानिधी ? । अपूर्व हें दर्शन या जनांमधीं. ।
दुरूनि आलासि म्हणौनि शंकलों । त्वद्रूप देखूनि मनीं सुखावलों. ॥ ६ ॥

तुझ्या पदाब्जीं शरण आलों, अरिष्ट हें वारीं. ॥ १ ॥
मज दीनासी तारीं तूं दीनकैवारी. ॥ ध्रु० ॥
हा झोंबला मोहपिशाच्च, यातें मंत्राक्षता मारी. ॥ २ ॥
शिवरामप्रभूच्या पदींच ठेवी संपूर्ण उपचारी." ॥ ३ ॥

ऐसी ऐकोनि प्रेमवाणी, । रायासि ह्मणे **गौतम**मुनि; । " धन्य, भूपाळा, ये जनीं; । कांहीं भय मनीं धरूं नको. ॥ ३८ ॥ दीनदयाळ **शिव** रक्षिता, । तो तुझ्या मस्तकीं असतां, । कैंचें भय **शिव**भक्ता ? । सांभाळिता **शिव**रावो. ॥ ३९ ॥ राया, ऐक. येक क्षेत्र । सकळ क्षेत्रांमाजि थोर, । पापताप करी संहार, । नाम मनोहर **गोकर्ण**. ॥ ४० ॥ ज्या क्षेत्राची महंती । ब्रह्मादिक स्तविताती. । तेथील स्मरणेंचि **पशुपति** । भुक्तिमुक्ती देतसे. ॥ ४१ ॥ सुलभ असतां **गोकर्ण**क्षेत्र, । कोणी न लक्षिती पामर. । दैवी माया बळवत्तर । **महाबळेश्वर** न भजती. ॥ ४२ ॥ तया क्षेत्रीं मज असतां । जनकें बोलाविलें यागार्था. । कौतुक पाहिलें येतयेतां । तें, नृपनाथा, अवधारीं. ॥ ४३ ॥ **लक्ष्मीनारायणा** शरण । **गोकर्ण**क्षेत्रमहिमावर्णन. । श्रोतीं व्हावें सावधान. । निरोपण अवधारा.

॥ ४४ ॥ ब्रह्मोत्तरखंडींची कथा । लक्ष्मीपति येथील वक्ता; । शिवमुखीं ग्रंथकर्ता । वक्ता वदविता आपण. ॥ ४५ ॥

**इति श्रीब्रह्मोत्तरखंडे शिवरात्रिमहिमावर्णनं नाम द्वितीयोऽध्यायः ॥२॥**

---

**॥ श्री सांबायनमः ॥**

श्रोतां सावधान व्हावें, । शिवमाहात्म्य परिसावें; । निरोपण हृदयीं धरावें; । फांकों नेदावें मन कोठें. ॥ १ ॥ राजा मुनीतें पुसत, । "काय आश्चर्य तें किंभूत? । तें मज सांगावें समस्त, । मातें कृतकृत्य करावें." ॥ २ ॥ "गोकर्णीहूनि मज येतां । कोणे येके ठायीं, नृपनाथा, । मध्यान्हसमयो होतां, । सरोवर आतां देखिलें. ॥ ३ ॥ करूनि करचरण-क्षालन, । निस्तरोनि मार्गींचा शीण, । वटवृक्षा साउलीस येऊन, । तेथें क्षणभर बैसलों. ॥ ४ ॥

तों तेथें कांहीं दूर प्राणी अनाथ परदेशी, रे; ।
कुष्ठवर्ण सर्वांगहि तीचें लोळतसे धरणीशीं, रे. ॥ १ ॥
ऐशी ते चांडाळ वनिता देखिली म्यां नयनीं रे. ।
शिवशिव तीच्या स्वरुपें कंटाळलों अंतःकरणीं रे. ॥ धृ० ॥
अंगोअंगीं पडले कीडे. रक्त पुवानें भरली, रे. ।
तिडक्या ठणकति, कंठ रोधे, घोरत तेथें पडली, रे. ॥ ३ ॥
विष्ठा मूत्रें जेथिल तेथें; माशा त्या गोंगाती, रे. ।
अस्ताव्यस्त अवयव जाले, दुर्गंधी बहु घाणे, रे. ।
मरणोन्मुख त्या प्राण्याची गति शंकर येकचि जाणे रे. ॥ ४ ॥
पापाचें फळ जाणुनि पूर्ण विस्मयलों अंतरीं रे. ।
शिवरामातें स्मरताचि तेथें राहिलों घडिभरि, रे. ॥ ५ ॥

तंव गगनींहुनि दिव्यविमानीं उतरत शिवकिंकर समुदें ।
रविशशितेजहि लोपवि दीप्ति दिशामान असे भोंवतें ।
....        ....        .... शिव भक्ताचि ते नुसधे ।
शिवरूप तनूसी धरूनि विराजति डोलती शैव पियूषमदें ॥ १ ॥

जवळि जवळि आले देखतां, त्या उदारा ।
नमित नमित गेलों मीं तयांच्या समोरा. ।
सविनय निजभावें पूसिलें म्यां तयातें, ।
"अति अभिनव देवा, कां उदेलेति येथें?" ॥ १ ॥

ते बोलिले मज, "मुनि, परिसी वृतांता. ।
लोळे धरेसि. दिसते महारीण आतां. ।
हे न्यावया प्रगटलों अवघे विमानीं ।
आज्ञापिलें पण अम्हांप्रति शूळपाणीं." ॥ २ ॥

ऐकोनि ऐसें त्यांच्या वचना । विस्मय वाटला अंतःकरणा, । म्यां पुशिलें त्यांसीं पुन्हा । भावें चरणा नमूनि. ॥ ५ ॥

पद.—( धाटी—कोदंडपाणि—राग धनाश्रि. )

"परम नियमय शरीर इचें । व्रत, जप, शिवभजन, न सेहे प्राणी ॥
केविं नेतां हे । शिव सान्निध हे? ॥ धृ० ॥
वारूनि मांसचि खातां । दुःशील, सदा जीवहिंसक, दिव्य विमानीं. ॥ ३ ॥
श्रवण, मनन, पण स्वपनीं । नसे, शिवस्मरण कदा न करीच निदानीं. ॥ ४ ॥
अघगिरि कोटि इचें बसलीच नसे । घडिही शिवभक्तपुराणीं. ॥ ५ ॥
पूर्णगुरुशिवरामचरित्र अपार । सुरासुर नेणति कोणी." ॥ ६ ॥

ऐशी ऐकोनि विस्मयवाणी, । ते मज बोलिले कृपा करूनि. । "मोठें कवतुक इची करणी, । गौतम मुनि, वदलासी. ॥६॥ तरी इची पूर्वजन्म-कथा । सावध ऐकें, मुनिनाथा; । हे पूर्वीं ब्राह्मणाची सुता । नामें तत्वतां सौमिनी. ॥ ७ ॥ ते सर्व लक्षणीं संपन्न । वाढों लागली दिनें दिनें; । कोणे येक्या द्विजालागून । विवाह करून दिधली. ॥ ८ ॥ कित्येक काळ पतीसीं असतां, । नव यौवनींच निमाला भर्ता; । त्या दुःखें कांहीं दिवस नेतां । मन आवारितां नावरे. ॥ ९ ॥ कामें हृदयीं विकृत केलीं । मग ते विधवा चौताळली. । जारकर्मीच सुखें रतली, । जरी रक्षिली बांधवीं. ॥१०॥ मग तें कळलें स्वजना; । बांधवीं टाकिली ते अंगना; । नेऊनि सोडिलें अरण्या. । माजि, जाणा, तियेसी. ॥ ११ ॥ तेथें विचरतां तियेसी । देखिलें

शूद्रें येके दिवशीं. । तेणें नेली निजगृहासी । रतिविलासीं भोगांवया. ॥१२॥ मद्यमांसातें भक्षित. । तया शूद्रासि रमत. । असतां पुत्रही जाले तेथें. । काळ क्रमित राहिली. ॥ १३ ॥ भर्तार गेलिया बाहेरी, । मांसअपेक्षा जाली अंतरीं. । निघाली निशीच्या अवसरीं । आयुध करीं घेऊनियां. ॥ १४ ॥ निघोनि शेळिया कळपामधीं । गोवत्स घेतलें मेषबुद्धीं. । शस्त्र घातलें मर्मसंधीं, । मांस आधीं काढिलें. ॥ १५ ॥ न कळत कापिलें वांसरूं; । पडला गडद अंधकारू. । घरासि घेऊनि आली भारु । मांसआहारु करावया. ॥१६॥

पद—( राग—कामबोध. )

नेणों तिचा पुण्यपूर्वलेश उगवला; ।
कांहीं येक अंधकार निशे विवळला; ।
लाहेंचि ते भ्रष्ट योषा देखे गोवत्साला. ।
'शिव! शिव !' ऐसा शब्द तियेच्या मुखामाजि आला. ॥ १ ॥
वा, रे, काये वानूं शिवस्मरणाची थोरी ? ।
अवचट स्मरला ' शिव शिव ' ऐसा दे निजपद त्रिपुरारी ॥ ध्रु०॥
मग तें गोवत्साचें मांस रांधिलें येकांतीं. ।
खाउनि लटकी बाहिर केली गोवत्साची खंती. ।
कितेक दिवसां जालि तियेच्या आयुष्याची शांती. ।
यम तिसि नरका चुकउनि धाडी कर्मभूमी प्रती, ॥ २ ॥
ते हे एक्या चांडाळाचे उदरासी आली. ।
मदांधत्वें, पापबळें, जात्यंधा हे झाली. ।
शूद्रें आलिंगिली विधवा कुष्टें व्यापियली. ।
नामाच्या प्रतापें योषा गोकर्णा निघाली. ॥ ३ ॥
याच्ञा करित लोकांसवें पावलि गोकर्णा. ।
महाद्वारीं बैसुनि मागे, ' बानो, कांहीं द्याना. ।
क्षुधा पोटीं खवळे; अन्न देउनि निववा प्राणा, ।
ऐसी करतां ग्लांती, कोणी कांहीं तिसीं देईना. ॥ ४ ॥
कोणी येक भक्त तियेच्या हातीं बेल टाकी; ।
तिनें त्यजितां पडलें येक्या लिंगाचे मस्तकीं. ।

तेणें त्या शिवरात्रीं तियेसि तुष्टला पिनाकी. ।
शिवरामप्रभु पूर्ण कृपेनें राहिला हे शिवालोकीं. ॥ ९ ॥
जे ब्राम्हणी हे यमसेवकांनीं । नेली धरूनी यमसन्निधानीं, ।
विचार केला यमचित्रगुप्तीं । ' द्यावी कशी हे निरयाचे हातीं ? ॥ १ ॥
अनंतजन्मार्जित पुण्यसांठा, । तरी द्विजाच्या जन येति पोटा. ।
हे याच जन्मीं बहुपापकारी, । धाडूं जरी हे नरकासि नारी, ॥ २ ॥
तरि वधुनि निशीसीं वत्स हें मेषबुद्धीं ।
' शिव! शिव! ' वदली ते जाणतां तोचि संधी. ।
स्मरलि असाति योषा आवडी शंकरातें, ।
तरि सहज शिवाच्या पावली ते पदातें. ॥ ३ ॥
संपूर्णजन्मकृत दुर्घट पापराशी ।
येक्या तनूचपरि जावो यया स्त्रियेसी'; ।
ऐसाचि निर्णय करूनि यमें तियेसीं, ।
पैं घातलें श्वपचयोनिस या धरेसी. ॥ ४ ॥
औदासीन्यें ' शिव शिव ' स्मरली ते विरामीं, ।
तेणें करील बहु पुण्य पुढील जन्मीं. ।
उल्लंघुनी नरक सर्वहि त्याच योगें , ।
जाऊनियां शिवपदींच रमेल वेगें. ॥ ५ ॥
"येथेंच पापकृत दुःखहि भोगुनीयां, ।
लिंगासि बेल शिवरात्रिस वाहुनीयां, ।
निष्कामजागरणउपोषणींच ठेली; ।
तेणें गुणें शिवपदाप्राति योग्य झाली." ॥ ६ ॥
ऐसें ते मज बोलोनियां, राया, । तिची जीवकळा काढूनियां, ।
स्वानंदें विमानीं बैसऊनियां । चालिले तया शिवपदा. ॥ १७ ॥

पद.—( राग–सारंग. )

ते शिवकिंकरें निजनगरेसीं, बैसउनि तिसीं विमानीं, हो, ।
ध्वज, पताका, छत्रें, चामरें, मिरवित बहु सन्मानीं, हो. ।

भेरी, ढोल, नफेरी, दाटत नाद व्योमवितानीं, हो. ।
गाजत वाजत नानापरि गाती तानमानीं, हो. ॥ १ ॥
तीचा महिमा कोण वर्णी? नेणति जन हे कोणी, हो ।
जीच्या बोलें तुष्टुनि स्वपदा आणवि शूळपाणी हो ॥ ध्रु० ॥
येकाकीं ते दिव्यांबरघनभूषणीं झळकली, हो. ।
कस्तुरि मळवट दिव्य सुगंधीं अंगीं ते चर्चिली, हो. ।
मुक्ताहार गळां, सुमनेसीं वनमाळा शोभली, हो. ।
ठायीं ठायीं बिबुधीं सकळही उपचारीं पुजिली, हो. ॥ २ ॥
जन्मार्जित तें संचित घडोघडि आठवि तें सुंदरा, हो. ।
सात्विक भावें कांपत नयनीं स्त्रवती त्या जळधारा, हो. ॥
'कैसा बाप कृपाळु शंकर न करित कांहीं विचारा, हो?' ।
ह्मणे 'मज नेतो पूर्ण पदाप्रति शिवराम शिवपुरा हो.' ॥ ३ ॥

यापरी ते महासती । स्वानंदें अनुतापे चित्तीं; । उत्साहें नेली शिवभक्तीं । शिवपदाप्रति ते बाला. ॥ १८ ॥ देव दाटले विमानीं; । कौतुक पाहती नयनीं; । ह्मणती, 'अघटित शिवकरणी । नीचालागूनि पद देतू. ॥ १९ ॥ जीचा घेऊनी येक बेल, तिसीं दिधलें पद अढळ.' । "ऐसें स्तावित देव मेळ । गेले सकळ निजधामा" ॥ २० ॥ राजा पुसे गौतमासी, । "ते सती गेली ज्या लोकासी, । त्या शिवलोकाची रीति कैसी, । संक्षेपेसीं सांगावी." ॥ २१ ॥

पद.—( राग काफी—'घाटी मित्र सुदाया.' )

"ऐकें, राया, शिवलोकरीती भवभय नाहीं जेथें खंती, रे, ।
आनंदसीमेची थोर विश्रांति, ब्रह्मादिक जेथें आनंदती, ॥ १ ॥
तो लोक शिवरायाचा हो, मनें वाचा नागवे साचा;
वेदाही पार न कळे ज्याचा, हो. ॥ ध्रु० ॥
जेथें तमाचा प्रवेश नाहीं; सबाह्य स्वप्रकाश पाहीं, रे; ।
काढुनियां मन विषयींचे देईं; योगी रमती जयाच्या ठायीं, रे; ॥ २ ॥
काम, क्रोध जेथें न पैठे, जन्ममरणाची मति खुंटे, हो; ।
विहरति श्रुति ज्याचिया पैठे ज्याहुनियां आन न मोठें; हो; ॥ ३ ॥

यमनियमादिअष्टांग योगें साधक रिघती जेथें अंगें, हो; ।
अंगेना जो रात्रिदिवस विभागें, हो; केवळ ज्ञप्ति गौरिसी शिव वागे, हो;॥ ४॥
गुरुकृपें गेल्या जया ठिकाणीं येणें जाणेंचि नाहीं परतोनि रे; ।
पूर्णानंदें तें अनुभउनी, शिवराम नांदे अनुदिनिं, रे; ॥ ५ ॥

ऐसा, राया तो शिवलोक; । कुयोग्या दुर्लभ, देख. । जे निःसीम शिवभक्त निःशंक । तेथील सुख ते जाणती. ॥ २२ ॥

ये यत्कथाश्रवणकीर्तनजातहर्षाः ये सर्वभूतसुहृदः प्रशमैकनिष्ठाः ।
संसारचक्रमतिवाह्य निरस्तमोहास्ते शांकरं पदमवाप्य सुखं रमंते ॥ १ ॥

जे शिवकथेचे प्रेमळ, । जे दयार्णवाचे कल्लोळ, । जे शिवस्वरूपीं मननशीळ, । तें पद अढळ त्या लाभे. ॥ २३ ॥ यालागीं मित्रसह राया, । गोकर्ण क्षेत्रा जाऊनियां, । तेथें सर्व तीर्थीं न्हावोनियां, । महाबळपायां अवलोकीं. ॥ २४ ॥ शिवचतुर्दशी उपवास, । जागरणीं अति उल्हास, । ऐकेंही तूं विशेष । शिवकथा. ॥ २५ ॥ राया, तुजलागीं पाहीं । उपदेश केला ये समयीं. । आतां तूं त्या क्षेत्रा जाई. । आज्ञा देई मजलागीं." ॥ २६ ॥ ऐसें बोलोनि रायासी, । गौतम गेला मिथिलेसी. । राजा पावला गोकर्णासी. । त्या त्या विधीसी सारिलें. ॥२७॥ गोसहित अंतःकरण, । जेथें आत्मा महाबळ बिंबला पूर्ण, । यालागीं क्षेत्र हें गोकर्ण; । क्षेत्रांहूनी बळ थोर. ॥ २८ ॥ जेथ ज्ञानकोटी तीर्थ । सद्भावें जे स्नान करीत, । अवलोकितां महाबळनाथ । यातायात खुंटती. ॥ २९ ॥ जे हे शिवकथा ऐकती, । शिवभक्तांसी सांगती, । ते येकवीस कुळें उद्धरती; । स्वयें नांदती शिवपदीं. ॥ ३० ॥

इति कथितमहेशं श्रेयमारादिबीजं ।
भवशतदुरितघ्नं ध्वस्तमोहांधकारं ।
चरितममरगेयं मन्मथारे सदारं ।
सततमपि निषेव्यं स्वास्तिमानस्तु लोकः ॥ २ ॥

सकळ श्रेयाचें कारण । करी भवयातनाविध्वंसन; । मोहांधकारा पतन, । परम पावन शिवकथा. ॥ ३१ ॥ हे भवश्रांता संजीवनी, । अगत्य सेविजे मानवांनीं. । सकळ भोग भोगूनि जनीं, । पदनिर्वाणीं नांदवी. ॥ ३२ ॥

ब्रह्मोतरखंडींची हे कथा. । लक्ष्मीपतीच ग्रंथकर्ता. । पूर्णानंदें रसिक वक्ता; । शिवराम दाता गुरुरावो. ॥ ३३ ॥ श्रोतीं व्हावें सावधान, । पुढें शिवपूजा-महिमावर्णन. । निरोपणीं असावें मन । अनुसंधान अवधारा. ॥ ३४ ॥

## इति श्रीस्कंदपुराणे ब्रम्होत्तरखंडे शिवपत्रिमहिमावर्णनं नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

---

## ॥ श्री सांबसदाशिवाय नमः ॥

ऐका मागुता शिवमहिमा, । आश्चर्यभूमिकेची सीमा; । जें, ऐकतां धरूनि प्रेमा, । पापें भस्मा पाववी. ॥ १ ॥ दुस्तर भवाब्धीच्या ठायीं । बुडोनि, शीणतां तिजेविषयीं, । त्या शिवपूजानौकेविण कांहीं । उपाय नाहीं तरावया. ॥ २ ॥ यालागीं तरणोपायार्थ । शिवपूजा करावी येथें. । पूजा करावया जरी अशक्त, । पाहावी पूजित शिवमूर्ति. ॥३॥ श्रद्धेविणही शिवपूजन । करिती, किंवा पाहती जन, । तेही पण क्रमेंकरून । शिवनिर्वाण पावती. ॥ ४ ॥ येथें सांगेन इतिहास; । तो ऐकावा सावकाश, । जो अवधारितां विशेष । भक्तिउल्हास प्रकटवी. ॥ ५ ॥

विमर्षण नामें राजा कोणी, । शूर प्रतापी, पाळी धरणी, ।
सर्वदा पारधी विचरतु वनीं; । कृपेचा लेश नाहीं मनीं. ॥ १ ॥
तो पूजी गौरीशातें, हो सद्भावेंसी दिवानिशीशीं । सप्रेम सर्वही उपचारेंसी. ॥ धृ० ॥
सर्वही मांसमद्येंसीं खाय. । परदारांविण घडिही न राहे. ।
आचार त्याचा शिष्टां न साहे. । पण भक्तिपूर्वक उत्साहें, ॥ २ ॥
पक्षद्वयाच्या चतुर्दशीशीं । शिवलिंग पूजी संपदेसीं ।
पूर्णानंदें नाचे गाये विलासीं; । शिवरामप्रभु तुष्टे त्यासीं. ॥ ३ ॥

त्या दुराचाऱ्याची पट्टमहिषी, । कुमुद्वती नाम तयेसी, । देखतां त्याच्या स्वभावासी । ते मानसीं कंटाळे. ॥ ६ ॥ ते सद्गुणाचें माहेर । पण भक्तीचा नेणो अवतार. । तिनें येकांतीं सादर । निजभर्तार विनविला. ॥ ७ ॥

"स्वामी, अपूर्व करणी तुमची दिसे, हो, ।
आचार हा आणि शिवांघ्रिपुजास्वभावो. ।
सर्वस्वभक्षक, बहुविधही स्त्रियांसी ।
चोंढाळल्याविण घडी न गमे तुम्हांसी. ॥ १ ॥
तूं क्रूर, सर्वजिवहिंसक, दुर्विलासी; ।
ऐशा तुला उपजली शिवभक्ति कैसी?" ।
तोषूनि (त्यां) मग नृपाळ तियेचेनि (तिचेनि) बोलें, ।
प्राग्जन्मसंचित स्मरोनि, तियेसि बोले. ॥ २ ॥

पद.—( राग–मधुमाधवी. )

"ऐकें, प्रिये, प्राग्जन्मीं मी कुतरा, वो। झालों होतों; विचरें माजीं पिपाननगरा वो. ।
येकाकी, न साहे संग दुसरा वो, । आलों शिवमंदिरा लिंगपूजा वसरा वो. ॥१॥
तेव्हां पूजा होते माघमासीं, हो; । उत्सव देखिल त्या चतुर्दशिदिशीं, वो; ।
आनंदाविर्भावें गेलों पाशीं, वो. । माझा वावर न साहे त्या लोकांशीं, वो. ॥ धृ०
तंव ते मज मारिती दंडधारी, वो. । प्राण रक्षाया मीं पळें तेव्हां दुरीं, वो. ।
देउळाची करीत करीत फेरी, वो, । पुन्हां येउनि बैसें त्याच द्वारीं, वो. ॥ २ ॥
मागुती मारिती शिळापातें, वो, । पुन्हां धांवत धांवत फिरें देउळातें, वो. ।
येउनि बैसतां, मज तेथें, वो, । लोक भागती मारिती तीरघातें, वो. ॥ ३ ॥
मेलों तेथें लागतां शर देहीं, हो. । तेणें राजा झालों पृथ्वीच्यिये ठाईं, वो. ।
शिवदिवसोत्सव अवलोकितां कांहीं, वो. । तेणें प्रभावें मीं त्रिकाळज्ञ पाहीं, वो. ४
त्या जन्मसंस्कारें सर्व भक्षीं, वो. । थोरथोरांही मन घालीं प्रकृतिपक्षीं, वो. ।
तूंही आतां भजें, विरूपाक्षी, वो. । पूर्णानंदें राहें शिवरामाच्या लक्षीं, वो." ॥५॥

कुमुद्वती ह्मणे आनंदें, । "राया, तूं सर्वज्ञ शिवप्रसादें; । तरी माझ्या प्राग्जन्मींच्या कर्मबंधें । मज उद्बोधें सांगावें; ॥ ८ ॥ मी होतें कवणाची कवण? । कशी पावलें तव सन्निधान? । पुढिल भविष्यजन्मकथन । सांगें कृपेनें, स्वामिया." ॥ ९ ॥ राजा ह्मणे, "ऐकें प्रिये, । तूं कपोती होतीस, दिव्यकाये; । मांसकवळ धरूनि चांचुये । तुज निर्भय विचरतां. ॥ १० ॥ तें येक्या गीधें देखिलें. । तो तुज घाली झडप बळें; ।

तंव तूं पळालीस ते वेळे । आमिषकवळें निजलोभें. ॥ ११ ॥ तो गीध लागला पाठीसीं । मांसग्रासाच्या अभिलाषीं, । तूं श्रीशैल्याप्रती गेलीसी; । मग फिरलीसी शिवालया. ॥ १२ ॥ सन्मुख ध्वजीं तूं जाऊनि । बसलीस प्रदक्षिणा करूनि; । तेणें येऊनि झड मारूनि, । मांस घेऊनि तो गेला. ॥ १३ ॥ झडेखालीं गळे प्राण. । शिवांगणीं पडलीस वरून; । तेणें प्रभावेंचि तूं, जाण, । जालीस आपण नृपांगना." ॥ १४ ॥ कुमुद्वती म्हणे, "नृपति, । ऐकतां प्राग्जन्माची प्रवृत्ति, । आश्चर्य वाटतें माझे चित्तीं; । शिवार्चनभक्ति मज होते." ॥ १५ ॥

बोलतसे नृप "भामिनि, ऐक अतां पुढिल्या निज जन्मगतीसी. ।
सैंधवनामक मी नृप होइन संजयराजसुता तूं होसी. ।
तेथ तुशीं मज लग्न घडेल; तयाहि पुढील वृत्तांत परीशीं. ।
सौराष्ट्रेश्वर मीच कलिंगसुता मज येउनि तूं परिणीशी. ॥ १ ॥

गांधारभूपति चतुर्थभवासि होतों; ।
तूं मागधात्मजा तुशींच विवाह होतो. ।
होईन पंचमभवासि अवंतिराजा; ।
होसी दशार्णतनया मजलागिं भाजा. ॥ ३ ॥

अनर्तनामा सहाव्या भवासीं; ।
ययातिवंशीं उपजोनि येसी. ।
मी सातव्या जन्मि पांडपराजा, ।
नसेल तैं मत्सम भूप दूजा. ॥ ४ ॥

पद—( राग—मधुमाधवी. )

ऐकें, या जन्मींचा निजवैभवो. । सर्वशास्त्रज्ञ, थोर होइन, वो. ।
लक्षणोक्त तो माझा निजदेहो; । मज पाहतां निवती जनसमुदावो. ॥ १ ॥
काय वानुं या शिवपूजामहिमेसीं? । जेणें त्रिकाळ जाणणें मजपाशीं. ।
जन्मजन्म घेतांही मी सुखराशी । जन्ममरण मारुनी नांदें कैलासीं. ॥ धृ० ॥
पांडपवर्ण नाम राजा होईन. । राजपुत्रि, तूं वसुमतीअभिधान. ।
ऐकतांचि तुझ्या स्वयंवरा येईन. । सर्वरायां जिंकुन तुला वरीन. ॥ २ ॥

मग अपुल्या देशास येईन, वो. । यज्ञीं पितरां देवां तोषवीन, वो. ।
दानीं अभरां द्विजांसि करीन, वो. । रात्रंदिन सांब आराधीन, वो. ॥ ३ ॥
पदीं बैसउनी सुत वना जाईन, वो. । तप करीत अगस्त्यासि सेविन वो. ।
त्याच्या दयेनें पूर्ण ज्ञान लाहिन, वो. । तुशीं शिवरामीं मिळोनि जाइन वो. ॥४॥

यापरी प्रतिचतुर्दशी । पूजीत पूजीत महेशासी । सप्तजन्में राज्य-वैभवासी । भोगूनि पदासी मी पावे. ॥ १६ ॥ शिव-पूजा-दर्शन, वो सुंदरी, । येवढें सुकृत लाभे मज करीं. । येऱ्हवी श्वान कोठें दुराचारी? । कोठें कुसुरी शिवभक्ति? ॥ १७ ॥ यापरी ऐकोनि कुमुद्वती । पति विमर्ष-णाची ते वदंती, । दिवारात्रीं शिवमूर्ति । प्रेमें पूजिती ते जाहाली. ॥ १८ ॥ बाप ऋषी, हो, तुम्हीं ऐका, । तो विमर्षणही प्रेमळ सखा । उल्लंघूनि सप्तही भूमिका, । शिवपदपीठिका पावली. ॥ १९ ॥ हें शिवपूजेचें महि-मान । जे वाचिती ऐकती जन । येथें करूनि शिवभजन । शिवपद पूर्ण पावती. ॥ २० ॥ हे शिवपूजेची कथा । पूर्णानंद स्वयें वक्ता. । शिवराम आपण स्वतां । ग्रंथकर्ता निजबोधें ॥ २१ ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रम्होत्तरखंडे शिवकथायां शिवपूजावर्णनं नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

---

॥ श्री सांबायनमः ॥

पद.

हर हर शंकर देव दयानिधि माझा जिवलग, पाहीं; ।
ठाके भक्तनिदानीं ऐसा दुसरा देवचि नाहीं. ॥ १ ॥
तो शिव जीवाचा जिव्हाळा, आनंदपुतळा. ॥ धृ० ॥
सद्गुरुराज शिखामणि सर्वहि पांचिक-कोश-निवासी; ।
बुद्धिबोधें ह्रदयीं प्रगटुनि मोहध्वांत निरासी. ॥ २ ॥
आपणावांचुनि जगीं ठाव नुरवी पाहतां कांहीं; ।
पूर्णानंदें शिवरामप्रभु सर्वहि सर्वा ठायीं. ॥ ३ ॥

शिवालागीं भावार्थें, । अल्प कांहीं जरी देइजे तें, । तें सहस्त्रगुणीं फळा येतें, । ऐसें वेदांतें बोलती. ॥ १ ॥ पत्र, पुष्प, अथवा जळ, । शिवार्थ अर्पितां केवळ, । तें कांहीं बाहीं हो अळुमाळ । अनंत फळें वाढवी. ॥ २ ॥ सर्व धर्मां झुगारूनी, । जें बोलिलें श्रुतीं पुराणीं, । येक भजलिया शूळपाणि । कर्मबंधनीं नाकळिजे. ॥ ३ ॥ पुत्र, दारा, द्रव्य, संपत्ति, । यांवरी जेवीं असे प्रीति; । तैसा शिव धरिल्या चित्तीं । कोण न तरती प्राणिये. ॥ ४ ॥ याचिलागीं भक्त विरळा, । सांडूनि विषयवासना सकळा, । तनु, मन, हीं वोपूनि केवळ । भजती प्रेमळ शिवासी. ॥ ५ ॥

"सा जिव्हा या शिवं स्तौति, तन्मनो ध्यायते शिवम् ।
तौ कर्णौ तत्कथालोलौ, तौ हस्तौ तस्य पूजकौ ॥ १ ॥
ते नेत्रे पश्यतः पूजां, तच्छिरः प्रणते शिवम् ।
तौ पादौ च शिवक्षेत्रं भक्त्या पर्यटतः सदा ॥ २ ॥
यस्येंद्रियाणि सर्वाणि वर्तंते शिवकर्मसु ।
स संतरति संसारं, भुक्तिं, मुक्तिं च विंदति " ॥ ३ ॥
जिव्हा तेचि ह्मणावी, जे शिवनामातें उच्चारी. ।
मनही तेंचि मनोहर, शंकर ध्यातसे अंतरीं. ॥ १ ॥
यापरि सर्वहि इंद्रिय–वृत्ति ज्याचे वेंचली शिवकर्मीं. ।
त्या पुरुषा संसाराचि नाहीं असतां कर्माकर्मीं. ॥ धृ० ॥
ते निजकर्ण महेश्वरचारितें ऐकती सादरवृत्ती. ।
ते कर दिव्य शिवाचे पढिये जे शिवपद पूजिती. ॥ २ ॥
धन्य विलोचन सर्वहि भूतीं पाहति जे शिवपूजा. ।
पाय तयाचे सार्थक फिरती गिरीशालय वोजा. ॥ ३ ॥
बुद्धि तेचि जे निजबोधें शिवरूपातें जाणे. ।
तोचि अहंकृति सर्व शिवोहं स्फुरतां शिवरुप बाणे. ॥ ४ ॥
इंद्रिय असतां दिसतां कर्मीं तोचि अतींद्रिय पाहें. ।
जो शिवरामीं पूर्णानंदें शिवमय होउनि राहे. ॥ ५ ॥
जो सर्वदैव शिवभक्तिस वीकलाहे, ।
त्याचें शरीर शिवदेउळ पूर्ण पाहें, ॥

आचार, शील, कुल, कर्म, तयासि कैंचें ? ।
प्रत्यक्ष तो शिव असे पण आगमाचें. ॥ १ ॥

अज्ञानियां नेणुनिही विधीसी, । सप्रेम जो पूजित शंकरासी. ।
तो पावतो नीट उमेशलोका, । सांगेन येथें इतिहास ऐका. ॥ २ ॥

उज्जनी नगरामाजी जाण, । कोणी एक राजा चंद्रसेन; । मनुष्यवेषें पाहतां लक्षण, । पाकशासन दूसरा. ॥ ६ ॥ तेथें महाकाळ शिवमूर्ति, । अखंड करी निजवस्ति, । तयातें पूजितो नृपति, । परम भक्ती वालभें. ॥ ७ ॥ शिवपार्षद्वां अग्रगणी । त्यांसी सखा जाला शिवपूजनीं, । त्याचें नाम मणिभद्र म्हणौनि । त्रिभुवनीं तो वंदू. ॥ ८ ॥ कोणीएक वेळे रायाला । तो मणिभद्र प्रसन्न झाला. । चिंतामणि राजया दिधला, । सखा आपुला म्हणौनि. ॥ ९ ॥

तो मणि कौस्तुभा दीप्तिपरी बहु झळकत सूर्यसमान उजाळें. ।
देखियला, कीं ध्यायियला, तरि सर्व (हि ?) मंगळ दे समकाळें, ।
दीप्ति पडे भलत्या गण धातुसि लोहि परिस करी गुणमेळें, ।
तो गुरुवाक्यमणि हृदयीं पदकींच धरी नृप भक्ति सुकाळें. ॥ १ ॥

तो मणिराज ग्रिवेसि विभूषित ऐकुनि येर नृपां साहवेना; ।
स्नेह नये, पण मागुंहि धाडिति; त्या मणिची गति त्यांसि कळेना. ।
तो नृप नेदि म्हणूनि समत्सर सज्जिति भूप चतुर्विध सेना ।
झोडुनि, मारुनि, घेउं म्हणौनि रुंधिति ते मग उज्जनिठिकाणा. ॥ २ ॥

सौराष्ट्र, कैकय, कलिंग, आणीकही जे ।
पांचाळ, मद्रक, अवंतिसुवीर राजे, ।
आणीकही गजपदाति रथाश्वदाटीं, ।
रुंधोनि मारिति धडाडित बाण कोटी. ॥ ३ ॥

तो चंद्रसेन नगरासि अनर्थ होतां, ।
पैं डळमळे न हृदयीं, न धरी अहंता; ।
गेला त्वरें शरण त्या गिरिशा विशेषें ।
रात्रिं दिवा अढळ लिंग पुजेसि बैसे. ॥ ४ ॥

सर्वोपचारसह पूजित चंद्रमौळी. ।
तों एक गोपवनिता मग तेथ आली. ।
घेऊनि बाळ क (ड?) ये गतभर्तृका ते ।
देखे अपूर्व शिवपूजन स्वस्थ चित्तें. ॥ ६ ॥

पद ( राग—काफी )

शिवपूजेसि विलोकुनि गोपी गेली निज शिबिराशी, रे. ।
पूजा देखुनि बाळ तियेचें जवळचि शिबिरापाशीं, रे. ।
आणुनि गोटा येक मनोहर, बसलें शिवपूजेसी, रे. ।
मेळउनी सकळही सामुग्रिशी पूजी शिवलिंगासी रे. ॥ १ ॥
हर! हर! परम कुतूहल, शिवपूजेचा महिमा न कळे कोणा, हो. ।
अविधि पूजितां निजपद देतो कैलासींचा राणा, हो. ॥ धृ० ॥
भलतीं सुमनें, वनिंचीं गंधें, शिवलिंगासी, रे. ।
धूप, दीप ओवाळुनि, देतु कृत्रिम नैवेद्यासी, रे. ।
पुष्पांजुळि दे घडिघडि नाचे गाये देवापासीं, रे. ।
न ढळे बहुधा पाचारितां जननी भोजनासीं, रे. ॥ २ ॥
माता येउनि पाहातां तंव तें बाळ बसलें ध्याना, हो, ।
रागें ओढी मारी हाणी तंव तें नुघडी नयना, हो. ।
पूजा सर्वहि नासुनि दूरी झुगारि त्या पाषाणा, हो. ।
हाहाकारें रडतें बाळक टाकुनि गेली भुवना, हो. ॥ ३ ॥
मायध्वंसित पूजा देखुनि बाळ रडे आक्रोशें, रे, ।
मूर्छा येउनि पडला घडिभरि शुद्धीं नाहीं त्यासी, रे. ।
मग पहातां तें देउळ जालें झळकत रत्नप्रभेसी रे. ॥
कांचनमणिगणखचीत वेदी लखलखीत चौपाशीं, रे. ॥ ४ ॥
रम्य शिवालय त्यांत विलोकी रत्नमयी शिवमूर्ति, रे. ।
पाहातां तटस्थ, वेळा उठोनि गेली बाह्य स्फूर्ति, रे. ।
पूर्णानंदें सावध जाला धैर्य धरूनि चित्तीं, रे. ।
शिवरामप्रभु वंदुनि कैसा भगवंतासी प्रार्थी, रे ? ॥ ५ ॥

अन्याय हा क्षमा करीं, श्रीशंभो; तुझ्या महिमे-सिमा कोण करी, श्रीशंभो ॥ ९० ॥
तूं सुकुमार, बहुसुखवासी, श्रीशंभो; देवा मज पाण्यालागुनि शीणलासी श्रीशंभो ।
मायामूढ तुला नेणे कीं, श्रीशंभो; मोह दूर झुगारुनि टाकीं, श्रीशंभो. ॥ १ ॥
मी अन्यायी बहुतांपरि, श्रीशंभो, तूं करुणाकर पतिता-वर, श्रीशंभो. ।
मज कनवाळू होसी जरि, श्रीशंभो, तरि जननीवरि कृपा करीं, श्रीशंभो. ॥ २ ॥

सांब, शिवा, जगदादिकंदा, श्रीशंभो, दुर्लभ तूं सनकादिक मुनिवृंदा श्रीशंभो. ।
नाकळसी गुणमयबंधा, श्रीशंभो, शिवरामप्रभुपूर्णानंदा, श्रीशंभो. ॥ ३ ॥

यापरी करूनि प्रार्थना, । तोषऊनि कैलासराणा, । सूर्य जातां अस्तमाना, । गेला स्वसदना गोपाळ. ॥ १० ॥ तें आपुलें शिबिर पाहे । तेंही स्वर्गापरी झळकता हे. । सुवर्णमणिगणें उभारिलें हें; । तेज न साये आकाशीं. ॥ ११ ॥ आनंदला अंतःकरणीं, । आंत प्रवेशला अस्तमानीं; । तो पर्यकीं पहुडली जननी । मणिगणभूषणीं लखलखीत. ॥ १२ ॥ ल्याली रत्नमय अलंकार, । नेसली क्षीरोदक दिव्यांबर, । दिव्यलक्षणें शोभा अपार, । सुरवधूसुंदरेपरि दिसे. ॥ १३ ॥ वेगें जाऊनि तीपासीं, । संभ्रमें उठी मायेसी. । “ ऊठ, वो माये गुणराशी, । कौतुक न पाहसी हें आधीं. ” ॥ १४ ॥ यापरी बाळकें उठविली; । ते सर्व पाहे माउली. । आश्चर्य देखोनि नेत्रकमळीं, । तटस्थ ठेली गोपिका. ॥ १५ ॥ हा शिवपूजेचा प्रसाद । पुत्रमुखें ऐकोनि विशद, । येऊनि रायासन्निध, । वृत्तांत समुदें कथियेलें. ॥ १६ ॥

राजा तियेची परिसोनियां गिरा, । आला पुजा संपउनी तिच्याघरा. ।
गोपीगृहा रत्नमया शिवालया । देखोनियां विस्मय वाटला तया. ॥ ६ ॥

प्रधानहि पुरोहितांसहित भूप तीचे घरीं ।
उमेशमहिमा विलोकुनि, ठकावला अंतरीं ।
सुसात्विक सुखें तया हृदयिं बाळ आलिंगुनी, ।
प्रजासहित ते क्षणापरिच कंठिली यामिनी. ॥ ७ ॥

तों अरुणोदयिं भुप बाहिर ते सरसावति युद्ध कराया ।
चार मुखीं नगरांतिल शंभुपुजामहिमा श्रवणीं भरुनीयां, ।

शस्त्र, धनू, शर टाकुनि अंतरिं येउं ह्मणती शिवभक्त पहाया, ।
तो विधुसेननिदेश न मानुनि, भूप पुरीं भरले मिळोनीयां, ॥ ३ ॥
गोपगृहाप्रति चालति भूपति; तों विधुसेनहि सन्मुख आला ।
त्यां बहु मानुनि, नेउनि अंतरिं, दिलें पृथगासन दिव्य तयांला, ।
देखुनि गोपसुता करुणार्थ उमापतिनिर्मित ते शिवशाला, ।
तुष्टुनि, देति धनाश्वगजादि बहु उचितें मग गोपसुताला. ॥ ४ ॥
पृथ्वीवरी जितुके जन गोवळ त्यांसि तया कुमरा नृप केलें. ।
सर्वहि ते शिवभक्तचि होउनि प्रेमसुधाजलधींत बुडाले, ।
तों हनुमान् प्रगटे, मग तेथ विलोकुनि सर्व उभे नृप ठेले. ।
भक्तिमनें तिहिं पूजियला; मग भीम तयां सकळांप्रति बोले. ॥ ५ ॥

त्या राजयांमाजी, जाण, । गोपकुमारासि आलिंगून, । स्वानंदें बोले हनुमान; । भावीलक्षणें जाणतु ॥ १७ ॥

पद—( राग–कामबोध ).

"ऐका, गुज हें माझें, । राजे हो, तुह्मीं वोजें; ।
भवनिधिपतितां नाहीं तारक शिवपूजेविण दूजें. ॥ धृ० ॥
पहा, पां, गोपकुमारें । पूजितां शिव अविचारें, ।
भाग्यबळें हा चढला दुर्लभ । शिवपदसाक्षात्कारें. ॥ १ ॥
प्रदोष जो हा कांहीं । दुर्लभ सकळ दिनांहीं. ।
शनिसितपक्षीं भवहर पुजितां, शिवपद पावति देहीं. ॥ २ ॥
हा गौळी सुखराशी । देइल यश सकळांसीं ।
याच्या अष्टमवंशिक नंदा येइल हरि जठरासी. ॥ ३ ॥
आजीपासुनि तुम्हीं याला । श्रीशंकरनामें बोला." ।
ऐसें बोलुनि हनुमा अंतर्धानाचि होउनि गेला. ॥ ४ ॥
नृप जे, हो, आले ते विधुसेनें बहुडिले; ।
पूर्ण गुरू शिवरामा पूजुनि आल्या मार्गें गेले. ॥ ५ ॥

शिवपूजामहिमा ऐशी । प्लवंगमें बोधिली श्रीशंकरासी; । तोही मग शिवभक्तांसी । सहित शिवासि पूजितु. ॥ १८ ॥ श्रीकर, आणि चंद्रसेन, । उज्जनींमाजी दोघे मिळोन । सख्यत्वेंसि शिवपूजन; । शिवसन्निधान

पावले. ॥ १९ ॥ येक उदार मनाचा, । येक तो साचार भावाचा; । सख्यसंबंध त्या दोवांचा । कवणें वाचा वर्णावा ? ॥ २० ॥ जैसें का जीवशिवांसी । सख्यत्वें पाविजे निजपदासि, । तैसें चंद्रसेनश्रीकरांसि । ऐक्यपदेंसी राहिवास. ॥ २१ ॥ दोवांच्या डोळां येक देखणें; । दोवांच्या पदीं येक चालणें; । दोवांच्याही अंतःकरणें । येक चिंतिणें शिवरावो. ॥ २२ ॥ दोवां येकपदीं रमणें, । दोवां येक्या शिवासि भेटणें, । नवल सख्य त्याचेनि विंदानें । दोवां दोनीपण दिसेना! ॥ २३ ॥ दोवां येकचि जिव्हाळा, । दोवे भोगिती येक सोहळा, । त्या दोवांची अभिनव लीला । स्वयें भोळा शिव वर्णी. ॥ २४ ॥ यापरी श्रीकर, चंद्रसेन । शिवपूजनीं शोभतां भेदेंविण, । देहीं असतां विदेही पूर्ण, । परम निर्वाण पावले. ॥ २५ ॥

इदं पवित्रं परमं रहस्यं स्वर्ग्यं यशःसंपत्तिदं विचित्रम् ।
आख्यानमाख्यातमघौघनाशनं गौरीशपादांबुजभक्तिवर्धनम् ॥ ४ ॥

परम पावन हे कथा । मोक्ष आणूनि दे हाता. । सद्भावें ऐकतां, वदतां । सर्व पुरुषार्थ वोळगती. ॥ २६ ॥ आख्यानामाजी लालवी, । पापतापा दूर पळवी, । सांबशिवाची भक्ति वाढवी, । स्वानंदें सुखवी सकळांतें. ॥ २७ ॥ ब्रह्मोत्तरखंडींचें सार, । कथा मुक्तीचें माहेर. । वक्ता येथें सद्गुरु उदार, । बलात्कार लक्ष्मीपतीचा. ॥ २८ ॥ लक्ष्मीपतीनें धरूनि हातीं, । शिवकथा मज दाविली निश्चिती; । येऱ्हवीं मज कैंची इतुकी मति । जे शिवकीर्ति वर्णावया ? ॥ २९ ॥ लक्ष्मीनारायणा शरण । जालें शिवपूजामहिमावर्णन. । शिवरामप्रभूचें निरोपण । सावधान अवधारा. ॥ ३० ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे शिवपूजावर्णनं नाम पंचमोऽध्यायः ।

---

## आरती.

जय देव, जय देव, जय जय शिवराया, । ज्योतिर्मया, सत्वर पावें लवलाह्या. ॥ ध्रु० ॥ सर्वहि धर्मां टाकुनि भजतां तुजलागीं, । त्यांचीं सर्वहि विघ्नें निरसिसि तूं वेगीं. । चिद्रूपत्वें प्रकटुनि त्यांच्या सर्वांगीं, । नीचनवें नांदविसी त्या राजयोगीं. ॥ १ ॥ अविचारेंचि बाळक श्रीकर तुज पूजी; । पर्णकुटीका केली वासवपुरि दूजी, । हरिरूपें त्याचिया वसुवंशामाजी । पूजे तुष्टुनि जन्मलासी तूं सहजीं. ॥ २ ॥ ऐसा भक्तालागीं शिव तूं कैवारी, । बोलों बससी, तेव्हां तुज कोण वारी ? । पूर्णानंदा, आम्हां जड जीवां तारी, । शिवरामस्वामिया, देवा त्रिपुरारि. ॥ ३ ॥

---

## लळीत.

करूनि सर्वधर्मत्याग । करितां शंकरपूजा सांग, ॥ १ ॥
शिव हा बोले निजभक्तांसि; । वारुनि बोधें गुणकर्मांसि. ॥ २ ॥
अन्य टाकुनियां अवलंबु । सर्व भूतीं भजतां शंभु, ॥ ३ ॥
पूर्ण शिवरामाचा धनी, । आराधितां अमनमनीं. ॥ ४ ॥

इति पंचमोऽध्यायः । आरती, लळीत समाप्त ।

---

श्रीसांबायनमः

# प्रदोषचरितवर्णन.

पद.—( चाल—द्रामाजीपं... )

ऋषि म्हणती, " सूता, या आम्हां प्रका... शिवभक्ति,
...र्गे अघकुळ जाळुनि, आमुची निर्मळ ... वृत्ति. ॥
आतां सांगें, प्रदोषसमयीं पुजिल्या गौरी... ।
कोण सिद्धि देतो भाललोचन भक्तांप्रात ... १ ॥

ऐसें शिवपूजामहिमान. पार जाणे कवण ?
येक शिव पूजितां सर्व पूजिले सुरगण. " ॥ ध्रु० ॥

सूत म्हणे " जी ऋषी हो, ऐका शिवपूजाप्रभावा. ।
असावा शिवचिन्मयरूपीं प्रेमाचा वोलावा. ।
दिवानिशीविण प्रदोषसमयीं भावें शिव पूजावा. ।
सर्वहि शिवमय हेंचि पूजन आवडे महादेवा. ॥ २ ॥

देहीं दैन्यदरिद्रदोषां अंधां हें अंजन. ।
ऋणसागरमग्न प्राण्यांसि नौका हे तारण. ।
राज्यपदींच्या चेवल्यां हें देतें पुनरपि राज्यासन. ।
बंधमोक्षातीत निजपद हातीं दे आणून. ॥ ३ ॥

काळदंडीं सांपडल्याही सोडवि शिवरावो. ।
शत्रु अवघे मित्रचि होती टाकुनि दुष्टस्वभावो. ।
शिव होउनि शिव पुजितां प्रगटे हृदयीं शिवाविर्भावो. ।
तया भक्तामागें पुढें वोळगे महादेवो. ॥ ४ ॥

दरिद्र, ऋणिया दुःखिष्टांत दोघे बहु थोर; ।
नरकाची यातना यांसि दुःसह घोरांदर. ।
पूर्णप्रदोषपूजनें हें दुःख वारी महेश्वर. ।
शिवरामप्रभु कथा सांगे ये विषयीं सादर. ॥ ५ ॥

विदर्भदेशीं सत्यरथ । राजा सुशील, मूर्तसत्य, । धीर, शूर, स्वधर्मरत, । पृथ्वी शासित निजमार्गें. ॥ १ ॥ यापरी त्या राजयाला । कित्येक काळ सुखें लोटला. । त्या रायाची कीर्तिलीला । येर नृपाळां न साहवे. ॥ २ ॥ शाल्वराजा विमर्षण, । आदिराजा दुर्मषण, । दळभारेंसीं सिद्ध होऊन, । विदर्भपाटण वेढिलें. ॥ ३ ॥ तिहीं विंधितां आपुली नगरी । राजा लोटला दळभारीं. । युद्ध मांडलें घोरांदरीं । परस्परीं हाणिती. ॥ ४ ॥ तों प्रारब्धकर्मेंकरूनि । राजा क्षीण झाला सैन्यीं. । आपणही निमाला रणीं; । साह्य कोणी न देखे. ॥ ५ ॥ रणीं पडला सुरथराणा, । उरली त्याची पळाली सेना, । आनंद जाला वैरियां मना, । गर्जती जाणा जयजयकारें. ॥ ६ ॥ नगरीं उठिला कोल्हाळ, । पट्टराणी शोकें विव्हळ, ।

निशेची पाहोनियां वेळ । येकली केवळ निघाली. ॥ ७ ॥ ते नृपांगना गरोदरी । पश्चिमे चालिली ते सुंदरी, । प्रभातेहूनि माध्यान्हावरि । हळूहळू मार्ग चालत. ॥ ८ ॥ तों देखे येक सरोवर; । मार्ग चालतां शिणली फार. । तेथें वृक्ष सदाट, थोर, । वेळाचें घर अति रम्य. ॥ ९ ॥ तेथें विश्रामली सुंदरी; । तों प्रसवली तेच अवसरीं. । पुत्र झाला सांगशरीरी, । निर्विकारी, लक्षणोक्त. ॥ १० ॥ ते तान्हेली सुंदरी । जळ घ्याया गेली सरोवरीं, । तों येक्या वोढिली जळचरीं । जळाहारीं ग्रासिली. ॥ ११ ॥ तें बाळ जन्मतेच क्षणीं । मायबापें नसती कोणी. । क्षुत्पिपासा न साहवे मनीं; । तें मोठेनि रडूं लागे. ॥ १२ ॥ तें शिशु आक्रोशें रडतां, । तेथें आली द्विजवनिता, । ते गतभर्तृका योषिता । आणि अनाथा परदेशी. ॥ १३ ॥ गांवोगांवीं यात्रा करित, । कडिये येक वरुनाचा सुत, । त्याच मार्गे सहज जात; । देखे तेथें बाळातें. ॥ १४ ॥ तें राजबाळक मनोरम, । रविबिंब पडलें निरुपम । तैसें देखतां शिशुतम, । चिंता परम पावली. ॥ १५ ॥

पद.—(राग–परज.)

अभिनव बाळक दिसतें नाभीनाळी अजुनी वोली, ।
ऐसी कैसी डांकिणि जननी, प्रसवुनि कोठें गेली? ॥ १ ॥
ऐसी ते मीमांसा, करूं लागे योषा. ॥ ध्रु० ॥
जनक, स्वजनही नसती जवळी शिशु पडलें भूमितळीं. ।
द्विजविट्शूद्रनृपाचें कीं हें नकळे सजला मूळीं. ॥ २ ॥
घेउनि पुत्रापरि प्रतिपाळूं? कुळ नकळे मज याचें. ।
पूर्ण अकळ शिवरामकुतूहल; पाप पहा बाळाचें. ॥ ३ ॥

यापरि योजित तेथ उभी तंव एक महायति तेथचि आला.

तो म्हणे, "माय, सुखें शिशु घे, मनिं संशय टाकुनि पाळि ययाला. ।
स्वल्प दिसांतचि या शिशुचेनिच पावसि पूर्ण महापदवीला."
बोलुनि तेथ असें शिवरामपरायण तो यति सत्वर गेला. ॥ १ ॥

ऐकतांच त्याचे बोल, । तेणें विश्वासेंचि बाळ । घेउनियां, ते तत्काळ । स्वगृहासि चालिली. ॥ येकचक्र गांवाआंत । भिक्षाटणातें करीत । राजपुत्र, निजसुत । प्रतिपाळूं लागली. ॥ सांगातें तियेचा बाळ । वाढतां द्विजीं सकळ ।

मुंजि बांधितां सुकाळ। भिक्षाचि आरंभिली. ॥ बाळांसीं भिक्षा करित। वाटे देवालय तेथ। देखतांच देउळांत। बायको ते चालिली. ॥ १ ॥ तों त्या देउळांत थोर। थोर होते द्विजवर,। शांडिल्यहि मुनिवर। होता तेथें बैसला. ॥ तियेपाशीं राजबाळ। देखतांचि कळवळ। येतां हृदयीं, तत्काळ। तो सहज बोलिला. ॥ "दैवबळ पहा काय!। राजपुत्र अप्रमेय। हा अनाथ अन्य ठाय। आश्रयोनि, जीवला. ॥ भिक्षुकाच्या मुलासवें। भिक्षुकचि जाला राव;। दैवगतीचें लाघव। न कळेचि कोणाला." ॥ २ ॥

पद.—(राग–परज.)

ऐकुनि त्याची वाणी तर्कुनि ते द्विजरमणी। बोले यति वचनीं.। "ज्यां हा सुत घेतला मज न कळे अजुनी. ॥ १ ॥ देवा, विस्तारुनि सांगावें,। कोणे कुळिंचीं याचीं जननी-। जनकें तें सर्वहि अघवें." ॥ ध्रु० ॥ ऐकुनि मुनिवर जेठी,। पाहुनि योग सुदृष्टी। बोले शिशुचे जन्मा धर्मा कर्माची परिपाठी. ॥ २ ॥ "ऐकें हा पुत्र विदर्भाचा,। संक्षेपेंचि तुज मी सांगें वृत्तांत सर्वहि त्याचा. ॥ ध्रु० ॥ बापें नेतां समरीं, माय पळाली रात्रीं.। राणी प्रसवुनि जळ सेवाया जातां ते गिळिली नक्रीं." ॥ ३ ॥ आश्चर्यें द्विजवनिता पुन्हा पुसे. "मुनिनाथा,। युद्धीं कैसा राजा निमाला, ते काय अवस्था? ॥ ४ ॥ स्वामी, सांगावें पुनरपि मातें,। हाही टाकुनि दैन्यदशे कैंवि पावेल निज राज्यातें. ॥ ५ ॥ पोटिंचा सुत हाही लंघुनि दैन्य उपायीं। शिवरामप्रभु वैभव कैसा पावे पूर्ण देहीं? ॥ ६ ॥

शांडिल्य बोले मुनिकेसरी,। "सावध ऐकें, वो सुंदरी.। विदर्भराजा जन्मांतरीं। पांडवदेशावरि तो स्वामी. ॥ १६ ॥ सर्वहि धर्मांतें जाणता,। नीतीनें पृथ्वी शासिता,। कदाचित् प्रदोष समय येतां। शिवपूजार्थी बैसला. ॥ १७ ॥ शिव पूजितां निश्चळ। तों नगरीं जाला कोल्हाळ,। ऐकतांचि पूजा तात्काळ। टाकूनि, नृपाळ चालिला. ॥ १८ ॥ इतुक्यामाजी ते वेळीं। विदर्भप्रधान महाबळी। शत्रुसैनिक तत्काळीं। रायाजवळि आणिला. ॥ १९ ॥ प्रधान समस्ते आणिला,। देखोनि राजा क्रोधा चढला.। त्याचा शिरच्छेद करविला। तैसाचि आला गृहासि. ॥ २० ॥ पूजानियम न संपवून। रात्रीं केलें भोजन;। त्याच्या पुत्रेंही शशिभूषण। प्रदोषीं जाण न पूजिला. ॥ २१ ॥ अन्न खाऊन तये रातीं। तैसाचि निजेला

दुर्मति. । तो जन्म जाला नृपती, । कांहीं पशुपति न पूजितां. ॥ २२ ॥ पूर्ण पूजिला नाहीं त्रिपुरारि; । यालागीं हारि पावला समरीं. । वैन्यांनीं वधिला भोगांतरीं । पूजा बरी न घडतां. ॥ २३ ॥ ये जन्मीं हा त्याचाच पुत्र, । पूजिला नाहीं श्रीशंकर, । त्या दोषास्तव जाला दरिद्र; । भिक्षा घरोघर मागत. ॥ २४ ॥ याची पूर्वजन्मींची जननी । तिनें कपटें मारिली सपत्नी. । त्या हत्येच्या दोषेंकरूनि । जळचरवदनीं संपली. ॥ २५ ॥ जिहीं अर्चिला नाहीं पशुपति, । ते जन्मोजन्मीं दरिद्री होती, । हे पूजातिक्रमदोषवृत्ति । तुलाचि सकळार्थी प्रकाशिली. ॥ २६ ॥

**सत्यं ब्रवीमि परलोकहितं ब्रवीमि, सारं ब्रवीम्युपनिषद्धृदयं ब्रवीमि ।**
**संसारमुल्बणमसारमवाप्यजंतोः, सारेयमीश्वरपदांबुरुहस्य सेवा ॥ १ ॥**

हें सत्य, हेंच परलोकहित, प्रसंगें
सारांश हें उपनिषद्धुज तूज सांगें. ।
संसारिं या त्रिगुणवाडवतप्तजीवां
हें मुख्य सार, शिवपादसरोजसेवा. ॥ १ ॥

**ये नार्चयन्ति गिरिशं समये प्रदोषे, ये नार्चितं शिवमपि प्रणमन्ति चान्ये ।**
**ये तत्कथाः श्रुतिपुटैर्न पिबान्ति मूढास्ते जन्मजन्मसु भवान्ति नरा दरिद्राः॥ २॥**

जो या प्रदोषसमयीं गिरिशा पुजीना,
कीं अर्चिला शिव विलोकुनि जो नमीना, ।
जे हे कथाहि पण नायकती निकामी
होती दारिद्रि बहु ते नर जन्मजन्मीं. ॥ २ ॥

**ये वै प्रदोषसमये परमेश्वरस्य, कुर्वन्त्यनन्यमनसोऽङ्घ्रिसरोजपूजां ।**
**नित्यंप्रवृद्धधनधान्यकलत्रपुत्रसौभाग्यसंपदधिकास्तइहैव लोके ॥ ३ ॥**

जे या प्रदोषसमयीं परमेश्वरासी
भावें सदैव पुजिती अमळें मनेंसीं, ।
ते नित्य फार धनधान्यकलत्रपुत्रीं
नांदोनि ते वसति शंभुगती पवित्री. ॥ ३ ॥

कैलासशैलभुवने त्रिजगज्जनित्रीं, गौरीं निवेश्य कनकाञ्चितरत्नपीठे ।
नृत्यं विधातुमभिवांछति शूलपाणौ, देवाः प्रदोषसमये नु भजन्ति सर्वे ॥ ४ ॥

कैलासदिव्यभुवनीं जगदंबिकेसीं
रत्नासनीं बसवुनी गिरिशें प्रदोषीं, ।
नाचावया हृदयिं वांछित शूळपाणी, ।
तो देव सर्व पुजिती सकळीं मिळोनी. ॥ ४ ॥

वाग्देवी धृतवल्लकी शतमखो वेणुं दधत्पद्मजस्तालो-
न्निद्रकरो रमा भगवती गेयप्रयोगान्विता ।
विष्णुः सान्द्रमृदंगवादनपटुर्देवाः समंतात् स्थिताः
सेवन्ते तमनु प्रदोषसमये देवं मृडानीपतिम् ॥ ५ ॥

वीणा वाणी, शतमख पाणी वेणु वाजवी वदनीं, ।
अंबुजयोनी ताल धरूनी, थै थै करित मुखांनीं. ॥ १ ॥
अर्णवकुमरी सप्तसुस्वरीं गाती, नाद मुरारी ।
धरी मृदंगीं नाना कुसरी धौंधौंधिमिकिटिगजरीं; ॥ २ ॥
सुरवरपाळी हातीं टाळी, 'हरिहर' देति आरोळी, ।
पर्वतबाळी पाहे शूळी, दाटे सुखकल्लोळीं. ॥ ३ ॥
देव मिळोनी वर्षति सुमनीं तनुमन वोंवाळूनी, ।
त्रिशूळपाणी देखुनि नयनीं निवती अंतःकरणीं. ॥ ४ ॥
पूर्णविदेही त्या शिवपायीं रमती नृत्यासमयीं ।
जो वेदांहीं अकळ विपायीं तो शिवरामा हृदयीं. ॥ ५ ॥

गंधर्व, यक्ष, उरगासुर, । सिद्ध, साध्य, विद्याधर, । चौदाही लोकींचे सुरासुर । मिळती अपार ते समयीं. ॥ २७ ॥ यालागीं पूजितां येक पशुपति । सर्वही पूजिले होती. । शिवभक्तांसि अनन्यप्रीति । सर्वही वोळगती सिद्धी त्या. ॥ २८ ॥ बाई, ऐकें, वो सुंदरे, । पूर्वजन्मीं या तुझ्या कुमरें । काळ नेला पतिगृहभारें । दानाचें वारें हा नेणे; ॥ २९ ॥ यालागीं दरिद्री जाला. । त्या दरिद्रदोषपरिहाराला । शरण जाय शिवपाउलां, ।

पूजोनि शिवाला प्रदोषीं." ॥ ३० ॥ कथा चालिली पूर्णानंदीं. । द्विजस्त्रियेसीं शांडिल्य बोधी. । पुढें प्रदोषपूजेचा विधि । पूजासिद्धि योगाची. ॥ ३१ ॥ ते कथा परम पावन. । वक्ता लक्ष्मीनारायण. । तोचि लक्ष्मीपति होऊन । कथे उद्बोधन करीतसे. ॥ ३२ ॥ शिवरामाचें अभिधान । धरूनि बोले नारायण. । पूर्णानंदें शिवपुराण । असाधारण चालवीं. ॥ ३३ ॥ स्कंदपुराणीं ब्रह्मोत्तर- । खंडींची कथा मनोहर । विवेकें करूनि मन स्थिर, । श्रोते सादर परिसोत. ॥ ३४ ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे प्रदोषमहिमावर्णनं नाम षष्ठोऽध्यायः॥ ६ ॥

---

श्रीसांबायनमः ॥

ऐकोनि त्याच्या वचनार्था, । ऋषीस पुसे पुन्हा योषिता. । शिवपूजाविधि तत्वता । शांडिल्य स्वतां बोलतु. ॥ १ ॥ "पक्षद्वयांच्या त्रयोदशीसि । दिवसा निराहार उपवासी, । घडी तीन उरल्या अस्तमानासि । शौचस्नानासि सारावें. ॥ २ ॥ शुद्धवस्त्र परिधानीं, । नियत होऊनियां मौनी, । संध्या जपावी विधीकरूनि, । शिवपूजनीं वैसावें. ॥ ३ ॥ देवापुढें सारवूनियां नवोदकीं, । रम्य मंडप करावा साम्यकीं, । .......................... । वस्त्रादिकीं निर्धूत. ॥ ४ ॥ फलपुष्पपल्लवांनीं, । वितानादिकीं अलंकारूनि, । विचित्रयम तेथें काढूनि । पंचवर्णीं समवेत, ॥ ५ ॥ आपण बसावें वरासनीं, । पूजोपकरणें आधीं मिळवोनि. । आगममंत्रें मंत्रूनि । करावी मनीं भूतशुद्धि. ॥ ६ ॥ प्राणायामत्रयविशेषीं, । बीजवर्ण सबिंदूशीं, । करूनि मातृका न्यासासि, । ध्यावी मानसीं देवता. ॥ ७ ॥ वामभागीं गूहक मूर्ति, । दक्षिणे चिंतावा गणपति; । पार्श्वीं धर्मादिकांप्रति, । मूळमंत्रोक्तीं न्यासावें. ॥ ८ ॥ आधारादि हृदयावरि । क्रमें न्यासावा कामवैरी; । नवशक्तिमय सिद्धासनावरि । ध्यावी अंतरीं शिवमूर्ति. ॥ ९ ॥

पद—(श्रीराग.)

चैतन्यपुतळा, कर्पूरधवळा, । कंठीं धरिलें गरळा, । नवविद्याभक्ति कंडांच्या

रुळती भाळा, । विरागश्रुटिज्ञान निःशेष कळा, । पहातेक्षणीं वृत्ति विराति सकळा. ॥ १ ॥ तो शिव पाहतां अंतरीं, । स्फुरतो कैसा आंतुनियां, बाहेरी, । विवेकसर्प शोभति ते शरीरीं, । वामीं दिव्य चित्कळा उमा सुंदरी. ॥ ध्रु० ॥ भेद मारुनि व्याघ्रचर्म पांघुरे चांग, । हातीं तो स्वानंदमृग, । पार्श्वध पारा नुरवी अव्यंग । वराभय चार आयुधें हें सांग । मस्तकिं वाहे सतरावें थिरतें गांग. ॥ २ ॥ चहूं वाचा घागरिया । गजरें वर्णिती गया, । शम, दम फणिवलया, । तो निजडोळां नेतसे दशविलया, । मोहगज चिरुनि चर्मप्रावर्ण जया. ॥ ३ ॥ अर्ध भूषवी आई तदेहीं विदेही । म्हणवीना आहें नाहीं । शिवेंविण देखिली नसे घडिहि । जिच्या प्रभें जगा जगत्व पाहीं । गुळेसि गोडी तैसी मिनले दोघांहीं. ॥ ४ ॥ काम जाळिला क्षितीं क्षिति निष्काम विभूति । मिरवे अंगांगीं पशुपति । विश्वाभास लोपवी निजांगदीप्तीं । न्याहाळितां विसाऊ आला विश्रांती । पूर्ण आनंदें शिवरामीं विनटे वृत्ति. ॥ ५ ॥

यापरी शिवा शूळपाणी । ध्यान करूनि अमनमनीं, । मग आत्मया आपगालागूनी । गंधाक्षतासुमनीं पूजिजे. ॥ १० ॥ पुन्हा ब्रह्मपीठ सम्यक । मूळमंत्रीं पूजी साधक, । संकल्पासि घालूनि उदक । हृदयीं व्यापक धरावा. ॥ ११ ॥ ‘ आतां जें शरीरसंबंधीं । रुग, दरिद्र, उपाधि । हे निवारीं, गा करुणानिधि ’ । ऐसें आधीं प्रार्थावें. ॥ १२ ॥ ‘ यावें शिवा, व्योमकेशी, । अभयंकरा, तेजोराशी, । कृपेनें घ्यावें पूजेसि । पार्वतीसीं, शिवराया. ’ ॥ १३ ॥ ऐसें शिवासि प्रार्थून । आरंभावें बाह्य पूजन; । सव्य, अपसव्य ग्रहगण । चिंतूनि यजन करावें. ॥ १४ ॥ क्षेत्रेशा स्तुतिवाणीं । क्रमेंकरूनि कात्यायनी, । धर्मज्ञानकें वैराग्य-गुणीं । कोनीं कोनीं पूजिजे. ॥ १५ ॥ त्या कोणी पाठपाद । स्वरीं पूजिजेत विशद । मग पूजावा अधर्मवृंद । विसर्गबिंद नमो ते. ॥ १६ ॥ चहूं दिशांसि तारक । मध्य अनंत सम्यक । गुणत्रय तरुरूप । पीठीं देख न्यासावीं. ॥ १७ ॥ तया बहुल्यावरिल्या दळीं । माया विद्या सिंधुवाळी । शिवेंसीं पूजावी त्रिमंडळीं । अक्षरमेळीं सरोजीं. ॥ १८ ॥ पूजोनियां त्रिकमळीं । तया यंत्रमध्यमंडळीं । वाम, ज्येष्ठा दिशा स्थळीं । चारी मुली पूजाव्या. ॥ १९ ॥ वामाद्या नवशक्ति । नवस्वरीं पूजिजे प्रीतीं ।

प्रथम गणाच्या आवृत्तीं । पंचमूर्ति पूजिजे. ॥ २० ॥ अनंतादिक देखा । पराव्या त्या मातृका । आणि त्या वृषादिका । अणिमादिका अष्टसिद्धि. ॥ २१ ॥ इंद्रादिक उदायुधी । वृषभ, चंडीश, दुर्गा, नंदी । सहित क्षेत्रज्ञा स्कंधी । गणेशादिसमवेत. ॥ २२ ॥ ऐशा अवर्णी देवतांनीं । युक्त पूजावा शूळपाणी । पंचामृत, शंखजीवनीं । अभिषेचनीं रुद्रसूक्त. ॥ २३ ॥ मंत्रीं कल्पावें हेमासन । अर्घ्योदक द्यावें अष्टगुण । सर्वांचि द्यावें आचमन । मधुपर्क जाण अर्पावीं. ॥ २४ ॥ निस्तरंग प्रेमस्नान, । संप्रतीतीचें आचमन, । दिगांबर परिधान । भक्तिभूषणें चढवावीं. ॥ २५ ॥ ज्ञानयज्ञ पवित्र शुद्ध । सोहं उगाळुनियां गंध । अविनाशी तिलाक्षता प्रसिद्ध । देव सद्यः पूजावा. ॥ २६ ॥ गुणत्रयाचा वाहूनि बेल । अर्चिजे सुमनें सकळ । जीं शिवा आवडती प्रेमळ । तीं सुमनें सबेल वाहावीं. ॥ २७ ॥ वासना चुरूनि कीजे धूप । विज्ञानाचा करावा दीप । षड्रसांचा नैवेद्य उमप । स्वानुभवरूप अर्पावा. ॥ २८ ॥ सुखअनुभवांतीं संतोष । तेंच पायस, घृत, मोदक, । शर्करा, मधु, गोडीचे देख । स्वाद रसिक शिव जाणे. ॥ २९ ॥ या चवीनें जाळावा वन्ही । आगमोक्त मंत्र-विधानीं । पुन्हा येऊनि शूळपाणी । करक्षालनीं जळ द्यावें; ॥ ३० ॥ शिवें सामर्थ्य दिलें जरी । तरी पूजावें सर्वोपचारीं, । अशक्त आहे व्यवहारीं । शक्त्यनुसारीं यजावें; ॥ ३१ ॥ नामीं करूनि अंगपूजन । पुष्पांजुळि अर्पूनि आपण । पार्षदादि, गणेशादि, शिवगण । तेहि जाण पूजावे. ॥ ३२ ॥ इतुकीहि खटपट नुरके । तरी पुष्पमात्र अर्पी प्रेमें येकें, । भक्तीं अभिषेचिल्या उदकें । शंभू सुखें तुष्टतु. ॥ ३३ ॥ नानापरी स्तवूनि सांग, । नमन करूनि साष्टांगें, । प्रदक्षिणा करावी चांग । विधिनियोग अनुसरोनि. ॥ ३४ ॥ वृषभ चंडी सुश्वरादिकां । पूजा संपवूनि सकळिका । मग अर्पावी विश्वव्यापका । तेचि ऐका प्रार्थना. ॥ ३५ ॥

पद—( राग–वसंत. )

जय जय देव जगन्नाथा शंकर शाश्वता ।
शरणागत तुझें मी दीन तारीं मज आतां ॥ ध्रु० ॥
सर्वसुराध्यक्ष जय जय सुरार्चितपादा ।
जय गुणातीत, विश्वंभरा, वरदप्रदा, ॥

कोटिसूर्यप्रभामया, जगदानंदकंदा, ।
भक्तार्तिभंजना, निराधार, निजबोधा, ॥ १ ॥
कृपासिंधु, गौरीवल्लभ, जय जय विरूपाक्षा, ।
नागेंद्रभूषण, चंद्रशेखरा, अलक्षा, ॥
दुस्तर भवसागरीं तुझ्या लागलोंसे पक्षा ।
शंभो, करीं मजकडे करुणाकटाक्षा. ॥ २ ॥
महाशोकमहार्णवीं ग्रासिलों चळचरीं, ।
तुला स्मरूं म्हणतां नाहीं उसंतु तिळभरी ॥
पूर्णानंदा पाहूं नका अंत इतुक्यावरी ।
शिवरामा ठेवीं निजपदीं झडकरी. ॥ ३ ॥

यापरी करूनि प्रार्थना । तोषविजे शशिभूषणा । चतुर्विधा भक्ति नाना । प्रार्थावें जाणा स्वाधिकारें. ॥ ३६ ॥ मग ब्राह्मणांसमवेत । भोजन करावें विधिवत; । ग्रासोग्रासीं नाम स्मरत । जय उमाकांत दीनबंधु. ॥ ३७ ॥ यथासांग शिवपूजन । हें तुजलागीं कथिलें पूर्ण । परमपातका करी क्षालन, । दे आणून कैवल्य. ॥ ३८ ॥ स्वानंदें करावें पूजन, । न करावें शिवद्रव्यहरण, । द्रव्य अपहारितां अभिलाषून । नरकाहून न सुटिजे. ॥ ३९ ॥ हा प्रदोषपूजेचा शिवविलास । समस्तश्रुतींचें अति रहस्य । तुजलागीं सांगितलें विशेष । येथें विश्वासु तूं धरीं. ॥ ४० ॥ या दोहीं मुलांसरिसी । शिव पूजिसी प्रदोषीं । संवत्सरांतचि विशेषीं । महा पावसी सिद्धीतें. ॥ ४१ ॥

पद—( राग—देशी एकटाळीं. )

पुनरपि ते द्विजसुंदरा । वंदुनि मुनिपदपंजरा ।
म्हणे "मज करुणासागरा । कडे घालीं भवसागरा. ॥ १ ॥
तारावें त्वां आम्हांसी । तुज वोपिलें या कुमरांसी ।
मी शरणागत रे परदेशी । तुझी केवळ निजदासी. ॥ ध्रु० ॥
धर्मगुप्त नृपकिशोर । शुचिव्रत हा कुमार ।
शिष्य हा तुज निर्धार । यासि करावा उद्धार. ॥ २ ॥

केवळ गुरु तूं निजरूपनामीं । पूर्ण श्रमलों भवकामीं ।
बोधुनियां निजआरामीं । आतां मिळविलें शिवरामीं. ॥ २ ॥

मुनिराया तुझे भेटी । मी कृतकृत्य जालें आजि सृष्टीं । शिवरहस्य सांग मजसाठीं । म्हणौनि गोरटी वंदितां," ॥ ४२ ॥

ऐकोनि तीची अति रम्य वाणी
शांडिल्य चित्तीं अति हर्ष मानी, ।
तिघां शिवाराधनमंत्रवीधी
केला मुनीनें उपदेशसंधीं. ॥ १ ॥

घेऊनि त्याचा उपदेश आदरीं;
ठेवूनि माथा मुनिपादपंजरीं ।
गेली सुखें ते अपुल्या स्थळाप्रती
प्रदोषकाळीं शिव नित्य पूजिती. ॥ २ ॥

## दोहरे—( चामरी ).

यापरि पूजितां यास । सुखें गेले चारि मास, ॥ घडिहि एक एकास । सोडीनात बाळकें. ॥ कोणी येक्या समयास । टाकूनि नृपात्मजास । द्विज-किशोर स्नानास । चालिलासे कौतुकें. ॥ तेथें पाझर वाहत । त्यांत एक्या खडकांत ॥ निधिकुंभ तो निवांत । तेजःपुंज चमके. ॥ दैवें दिधलें म्हणौनि । घरा आला तें घेऊनि, ॥ गुप्तरूप तें ठेवूनि । चित्तीं फार हरिखे. ॥ १ ॥ म्हणे "आई, अतीं येई, । कौतुक हें काये पाहीं, ॥ शिव-रायें लवलाहीं । द्रव्यसिद्धि दिधली." ॥ ते देखतां ते जननी । तटस्थचि ठेली मनीं; ॥ राजपुत्र बोलावूनि । दोघांसहि बोलिली. ॥ "बाप मी सांगतें ऐकाः । तुष्टला उमेश सखा, ॥ सम वांटणीच्या सुखा । पावलां महीतळीं." ॥ ऐकोनि द्विजकुमर । आनंदला सुखें फार, ॥ मायेसि नृपकिशोर । बोलतसे मंजुळ. ॥ २ ॥

## सवाई.

माये तयाचे अदृष्टवशें जुडलें धन घेउं दे तोचि सुखें वो,
त्यासि जया गिरिशें दिधलें मज तोचि करील कृपा शिवरावो. ।

यापरि बोलुनि निर्विषयांतुनि दोघेहि पूजित चिन्मयदेवो.
यापरि त्या उभयां पूजित असतां क्रमला मग वर्ष पहा वो. ॥ १ ॥

कोणे एक दिनिं द्विजबंधुसवें नृपपुत्र वसंतवनासि निघाला,
हांसत खेळत जात जात दुरि वसंतऋतु सुखवी वनवेळा, ।
गंधर्वात्मज त्या कुमरी शतशा तंव दुरुनी गोचर झाल्या,
देखुनियां द्विजपुत्र म्हणे "सखया युवती दिसत्याति उदेल्या. ॥ २ ॥

दादो, पुढें दिसतसे कळप स्त्रियांचा,
जावों नये पण तयांजवळी त्रिवाचा; ।
त्या कामचेष्टक, महाकपटी, मदांधा
नाना मुखें भुलविती अचुक प्रबुद्धा. ॥ १ ॥

यालागिं संगति धरूंच नये तयांची.
मी ब्रह्मचारि मज भीति असे श्रुतीची." ।
ऐसें वदोनि द्विजबाळक तेथ ठेला.
तो येकलाच नृपबाळक तेथ गेला. ॥ २ ॥

गंधर्वकन्या भंवत्या मिळाल्या.
एक्या मुलीनें नृपबाळ देखिला. ।
चित्तीं म्हणे, "नृपकिशोर येतो,
उन्मत्त हस्तीपरि पाय टाकितो. ॥ ३ ॥

लावण्यसिंधु सकळांगहि सुंदरू हा;
राजीवलोचन अनंगचि मूर्त पाहा." ।
चिंतूनि हेंचि हृदयीं सकळां सख्यांसी
ते नायका वदतसे कुशलोक्ति कैसी? ॥ ४ ॥

"जवळि वन, सयांनो, चांगलें येथ आहे,
बहुत बकुळपुष्पीं, चंपकीं दाटलें हें; ।
झडकरि पण तुम्ही जाउनी सर्व तेथें
कुसुमनिकर आणा; तों उभी मीच येथें." ॥ ९ ॥

पद—( राग—भैरवी. )

हर हर मज हे असी । सखिया धाडुनि सर्व येकली ती उभी । येतां देखुनि तया सुंदरातें । त्यानें देखुनि तया नायिकेतें, ॥ आला जवळि द्रवला देखुनि तीस चित्तें । त्या उभयांसि परस्परें दर्शन होत मनें मिनलीं सुमनीं ते. ॥ १ ॥ न कळे हे गति कैसी ईश्वराची। अघटित घटना घडवी मायालाघवेंचि । कोठिल कोठें मिनलीं प्रीतीनेंचि । वेगें उठुनि ते पल्लवासन दे सवेंचि । फळ, जल शीतल बहुविध देउनि वदत कुमारी गंधर्वनृपाची. ॥ ध्रु० ॥ "कवण, कवणाचा पुत्र तूं विलासी ? " । ऐसें पुसतां तो वदे वृत्त नायिकेसी । " मी वो नृपपुत्र; वैरीं वैभवासि । हरुनि विपिना वोपिलें, आलों तुजपासीं. । जननी, जनक मृत." म्हणुनि वदुनि मग आपण पुसे, "तूं कवण आहेसि ? ॥ २ ॥ पुसतां पुसतां तिच्या तिच्या देखण्यानें । अंतरंगीं वेधला पूर्ण कामबाणें । आंगीं पुळकांकित झाला संगतीनें । दुरुनि पाहतां टाकिलें धैर्य मानसानें । मंदहसितवदनेंदु विलोकुनि मंद पुसे शिवरामविभू प्रिया. ॥ ३ ॥

पद—( राग—भैरवी. )

" कवणाची कन्या ? काय चिंतितेसी ? । कांहीं बोलूं पाहसी वाटे मन्मनासीं. ।" ऐकोनि बोले हांसोनि त्या सखियासी । " कोद्रव नामक कोणी गंधर्वकुळेश्वरीं । आ............ती कन्या मी सकळगुणराशी. ॥ ध्रु० ॥ परम कुशला मी भूपाळबाळा; । माझें गाणें आवडे देवां, उर्वशीला; । तुवां मोहिलें मज आपणाला. । अभिनव बा तुझे मनांत मिळालें मन; । सुखीं सुख कोठून । कांहीं आनु नाठवे. ॥ १ ॥ तुजला देखतां तुजशीं येथें आतां । बोलावयासि उभी, टाकुनि त्या समस्तां. । जिणें संगीत गातां देवकांता । वळती, चतुर मजसमचि नसती कोणी, तुझी ही आतां; । स्नेह वाढवीं बरव्या हृदयविलासें; सर्वही दैवें मैत्री आम्हां जोडलीसे हे." । बोलुनि मुक्ताहार फार तोषें देउनियां । शिवरामकरणी न कळे पूर्ण म्हणौनि थकित ठेली खुलत मनांतरीं. ॥ ३ ॥

ऐकोनि वचना तिचिया । राजा बोले परतोनियां, । " भ्रष्टराज्या मज दरिद्रिया । कैसी जाया तूं होशी ? ॥ ४३ ॥ माय बाप तुज असती

शिरीं. । पित्राज्ञेविण तूं, सुंदरी, । केंवि होऊं पाहसी स्वेच्छाचारी ? । बुद्धि अंतरी तुज नाहीं." ॥ ४४ ॥ ऐकोनि ते बोली अवघड । मागुती बोलिली ते अपाड. । "तुज काय असे त्याची चाड ? । तैसेंच घडेसें करूं. ॥४५॥ पाहें माझें कौतुक. । आतां तूं जाय निःशंक. । परवां येच वेळे देख । येईं आवश्यक या ठायां." ॥ ४६ ॥ ऐसें बोलोनि भूप सुतासि । गेली ते निज-गृहा सखींशीं. । तोही येऊनि बंधूपाशीं । जाहल्या वृत्तांतासि कथियेलें. ॥ ४७ ॥ येऊनि कथिलें द्विजपत्नीतें. । दिनद्वय क्रमोनि तेथें, । सर्वे घेऊनि बंधूतें । पुन्हा तेथें पातला. ॥४८॥ तों ते अंशुमती, तिचा पिता । तेथें आली त्वरता. । तेणें देखोनि द्विजनृपसुता । सन्मानतां बैसविले. ॥४९॥

## पद—( राग—काफी. )

राजा गंधर्वांचा बोले, " ऐक, राजकुमारा रे, ।
काल गेलों होतों मी त्या कैलासगिरिवरा रे. ॥
शिव मज पाचारुनि बोले देखतां सुरवरां, रे. ।
' धर्मगुप्त कोणी येक तया दे तुझी कन्या सुंदरा, रे.' ॥ १ ॥
ऐसी मज देवाची आज्ञा, रे. । हे तूं अंगिकारीं प्राज्ञा, रे. ॥ ध्रु० ॥
' तो नृपपुत्र अकिंचन, राज्यभ्रष्ट शत्रु करितां, ।
सद्गुरुवचनें तेणें पुजिलें वर्षवरी मज आतां. ॥
त्या पुण्यें ते पितर तयाचे आले माझ्या पंथा. ।
होय सहायकारी जेणें त्याचें राज्य चढे त्या हाता.' ॥ २ ॥
इतुकें ऐकुनि भुवना येतां हेही मज विनवीते, रे. ।
धर्मगुप्त भूपात्मज, विवाह करूनि दे मज त्यातें, रे. ॥
हे शंकरकरणी जाणुनि आलों कन्या घेउनि येथें, रे. ।
पूर्ण मनोरथ तूझा केला शिवरामाच्या नाथें, रे. ॥ ॥ ३ ॥

जीवेंचि संहारुनि शत्रुवाहिनी,
स्थापीन तूतें नगरीं नृपासनीं. ।
दहा सहस्रावधि वर्षं ईसवें
भोगूनि संपत्सकलार्थवैभवें, ॥ ६ ॥

मग शिवसदनासी वैभवें पूर्ण जासी;
तनुसहित इयेसीं पावशी शंकरासी." ॥
प्रगटुनि गुज त्याला येंवि, गंधर्वरायें
दिधलि निजकुमारी राजपुत्रा उपायें ॥ ७ ॥

दिलीं आंदणें; दिव्य ते रत्नभार,
अलंकार, वस्त्रें, हिरे, मुक्तहार, ।
सहस्रां रथां, दासदासी अपार,
चुडारत्न आणीकही सैन्यभार. ॥ ८ ॥

दाहा सहस्र प्रिय हस्ति दीधले,
वारू तसे वीस सहस्र वोपिले, ।
आणीकही येक दिला रथ स्वयें,
शक्ती धनुर्युक्त, सवर्म सुप्रियें ॥ ९ ॥

भांडार मोठें अणि दासदासी
दिल्या स्वकल्पा परिचारणासी, ।
त्या धर्मगुप्तासि समर्पुनी सुता
स्वर्गासि तो कोद्रव चालिला स्वतां. ॥ १० ॥

यावरी धर्मगुप्त नृपति । सर्व सहाय सैन्यसंपत्ति । येऊनि आपुल्या राज्याप्रति । शत्रु अपरिमित मारिले. ॥ ९० ॥ शाल्व आणि दुमर्षण । आदि राजे सर्व मारून, । राज्यासना येऊन आपण । ब्राह्मणीं पूर्ण अभिषेचिला. ॥ ९१ ॥ निःकंटक राज्य करूं लागला, । प्रधानपुरोहितीं मानिला, । जिनें पूर्वी पोशिलें आपणाला । तेचि तयाला माय जाली. ॥ ९२ ॥ बंधु झाला तो द्विजपुत्र, । धर्मगुप्त विदर्भेश्वर । शिवआराधनीं सादर । शोभा नृपवर नृपां आणी. ॥ ९३ ॥ ऐसेच आणीकहि कोणी । प्रदोषसमयीं शूळपाणि । पूजोनि पावले मनींची धणी । शिवनिर्वाणीं नांदले. ॥ ९४ ॥ प्रदोषकाळीं शिवार्चन । हें वृत्त पहा असाधारण, । चहूं पुरुषार्थां आयतन । हें सोपान शिवपद. ॥ ९५ ॥ हा प्रदोषमहिमा जो कोणी । सांगे श्रोत्यांलागूनि । त्यासि दरिद्र न शिवे दुरूनि । वाढे अनुदिनीं संपदा. ॥ ९६. ॥

प्राप्य दुर्लभतरं मनुजाः शरीरं कुर्वन्ति ये हि परमेश्वरपादपूजां ।
धन्यास्त एव निजपुण्यजितास्त्रिलोकस्तेषां पदांबुजरजो भुवनं पुनाति.॥१॥

जे पावूनि नरदेहप्राप्ती । भावें परमेश्वरातें पूजिती, । धन्य ते आपुलें सुकृतीं । विकत त्रिजगती घेतली. ॥ ९७ ॥ त्याचिया निजपादधुळीं । पवित्र झाली भूमंडळी । वर्ततां ते संसारमेळीं । चंद्रमौळीस्वरूप. ॥ ९८ ॥ हे कथा परम पावन । प्रदोषपूजेचें महिमान । वक्ता लक्ष्मीनारायण । पूर्णानंदघन परब्रह्म. ॥ ९९ ॥ कौतुक केलें गुरुनाथें । धरूनि शिवराम नामातें ।.ब्रह्मोत्तरखंडींच्या कथेतें । अखंडित ग्रंथितु. ॥ ६० ॥

इति श्रीब्रह्मोत्तरखंडे प्रदोषमहिमावर्णनं नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

## आरती.

जय देव जय देव जय औदार्यसिंधो । माझें आरत पुरवीं शिव दीनबंधो ॥ ध्रु० ॥ न कळे न कळे तुझें पूजामहिमान, । रंका देसी देवा निज-सिंहासन, । विषयभोगां सबाह्य देउनि विज्ञान । देहींचे भागा विषयानंद-घन. ॥ १ ॥ प्रेमपल्लवदळ हें जळ दिधलें जीहीं । त्याच्या त्या अघराशी निर्दाळुनि देहीं । निजबोधें नांदविशी स्वपदाच्या ठायीं । प्रेमें तुज तें पढियें कांहीं आन नाहीं. ॥ २ ॥ नित्यानंदस्वरूपा जय पूर्णानंदा । व्याप्य व्यापक भेद न कैवल्यबोधा । तुझी महिमा नये श्रुतिच्या अनुवादा । शिव-रामेश्वर गुरू आनंदकंदा. ॥ ३ ॥

## ललित.

दे सत्वर तो राज्यासना । कां रे पूजे मन घालाना ॥ १ ॥
येतो सगळा भवहर ध्याना ॥ ध्रु० ॥
न लगे कांहीं आटाआटी । सांब वळगे पूजेसाठीं. ॥ २ ॥
पूर्ण प्रदोषीं शिवराम । पूजिलिया पुनरपि नुपजे काम. ॥ ३ ॥

॥ श्री सांबसदाशिव प्रसन्न ॥

इति सप्तमोऽध्याय आरति ललित संपूर्ण.

---

॥ श्रीसांबाय नमः ॥

# सोमवारव्रतवर्णन.

## सीमंतिनी.

पद--( राग-धनाश्री ).

नित्यानंद, निरामय, । जें निर्विकल्प जेथें अभय, ॥ जगदादिकारण, केवळ अव्यय । जाणती त्या शिवाची सोये. ॥ १ ॥ जन ते पुक्त मुनि जाण रे ॥ ध्रु० ॥ विषय बहुधा सेविजती ॥ पण शिवरूपीं मोठी आसक्ति रे । विषय जयासि आकळूं नेणे, ॥ अंतरिं जडला गौरीपति रे ॥ २ ॥ भलत्या हरतां कर्मांतरीं । आवडला ज्यासि त्रिपुरारी ॥ पूर्णानंदपद येच शरीरीं । पावति शिवरामीं निर्धारीं. ॥ ३ ॥

जो चढों इच्छी शिवस्थाना । विषय तरी क्षणभरी टाकवेना । ऐसाहि पूजी शशिभूषणा । पावे ठिकाणा भोगांतीं. ॥ १ ॥ मायामय या संसारीं । जो सर्वहि सुख टाकुनि दुरी । देहींच मोक्ष इच्छी जरी । कीजे निर्धारीं शिवपूजा. ॥ २ ॥ हें अगाध शिवपूजन । स्वर्गाऽपवर्गाचें कारण । सोमवारीं तरी विशेष जाण । प्रदोषादि गुणें बहु थोर. ॥ ३ ॥ किंवा केवळ सोमवारीं । जे शिव पूजिती अंतरीं, । इहपरलोकींची दुर्लभ परी । त्यांसि तिळभरी दिसेना. ॥ ४ ॥

उपोषित शुचि स्वयें करण जिंकुनीं सादरीं,
श्रुतिस्मृतिविधींत जो कुशल शंभुपूजा करी, ।
जनीं पुरुष हो गृही अणिक ब्रह्मचारी सती,
अभर्तृक सभर्तृका शिवपदासी ते पावती. ॥ १ ॥

सोमवारीं शिवपूजन, । स्त्री हो पुरुषीं करितां जाण, । सर्व सौभाग्य येतें धांवोन; । कथा सांगेन येविषयीं. ॥ ५ ॥ अभर्तृका कीं सभर्तृका । भावें पूजितां भूतनायका, । इच्छित वर पावती देखा, । येथें आइका इतिहास. ॥ ६ ॥ आर्यावर्ती राजा कोणी । चित्रवर्मा विख्यात जनीं । तो दुरात्मयांलागूनी । नीतिशासनीं धर्मराज. ॥ ७ ॥ धर्मसेतूचा रक्षिता ।

दुर्गीयांसी सत्ता, । सर्व यज्ञांतें यजिता, । शरणागतां पाळकु. ॥ ८ ॥ सकळ पुण्यांचा कर्ता । सर्व संपदेचा दाता, । समस्त वैरियां जिंकिता, । हरिहरभक्तां शिरोमणि. ॥ ९ ॥ तो अनुकूल स्त्रियांसि, । बहु पुत्र लाधला तेजोराशि; । मग प्रार्थितां बहुतां दिवशीं । येक्या कन्येसि लाधला. ॥ १० ॥ कन्या लाभे भाग्यें करीं । पार्वती लाहोनि जेंवि हिमगिरी । आपणातें मानी त्यापरी । पावला धणीवरि मनोरथ. ॥ ११ ॥ तो कोण्या एक्या वेळेसि । पाचारूनि थोर थोर ऋषि । त्यांसि पुसे कौतुकेंसीं । जन्मफळाशीं कन्येच्या. ॥ १२ ॥ त्यांमाजी एक द्विजाग्रणी । म्हणे "ऐक राजशिरोमणि । इचें नाम निवतें सीमंतिनी । नेणों भवानी मांगल्यें. ॥ १३ ॥ हे सुंदर दमयंतीपरी, । सर्व कळांविषयीं ब्रह्मकुमरी, । महागुणवंती लक्ष्मीपरी । सुमातेपरी सुप्रजा. ॥ १४ ॥ जानकीसारिखी धृतव्रत, । सूर्यापरी कांतिमंत, । चंद्रिकेसारिखी हे येथ । जाणा निववित स्वानंदें. ॥ १५ ॥ दहा सहस्र वर्षवरी । पुरुषेंसीं नांदेल हे सुंदरी, । अष्ट पुत्र प्रसवेल बरी । सुख भारी पावेल." ॥ १६ ॥ तो आणिकही एक ते वेळे । रायासि निःशंकु नीती द्विज बोले, । "चवदावे वर्षीं यया बाळे । वैधव्य घडलें पाहिजे." ॥ १७ ॥ तो तयाचा वाग्बाण । रायाचें मर्म भेदी पूर्ण, । तेणें व्याकुळ जालें मन, । मुहूर्त आपण ठकावला. ॥ १८ ॥ मग सर्वही ब्राह्मणां पूजोनि । पाठवी आदरें सन्मानीं, । प्रारब्ध बळवत्तर मानूनि । निश्चिंत होऊनि राहिला. ॥ १९ ॥

## सवाई.

ते सीमंतिनि शैशव लंघुनि सप्त समान सखीमुखींहूनि
वैधव्य ऐकुनि व्यग्रचि होउनि जाउनि मैत्रेयि पाय नमूनि ।
पूसत "माय वो मी शरणागत भीत अमंगळ ऐकुनि वाणी
सौभाग्यादिकवर्धक कर्मचि सांग समग्र मला करुणेनीं." ॥ १ ॥

## चामरी.

याज्ञवल्क्यपत्नी तेथ । ऐकोनियां तिची मात । बोले "बाई एतदर्थ । गौरीहर पूजावा. ॥ सोमवारीं उपोषण । धौत चीर परिधान । धरूनियां स्वयें मौन । पूजारंभ करावा ॥ यथाविधीसीं पूजन । ब्राह्मणांसि भुंजवून ।

शंकरासि तोषवून । इच्छावर मागावा. ॥ पूजोनि सदाशिवास । सौभाग्य तूं पावतेस । अनुमान तुवां यास । कांहींच न मानावा. ॥ १ ॥

पद—( चाल—वोवाळा वोवाळा विठला. )

ऐशी हे शिवपूजेची थोरी । तूं मनीं धरीं. ॥ ध्रु० ॥

अभिषेकें पापक्षय होय, । मीं सांगों काय ? ।
पीठ पूजिल्या मनोदय । सामराज्य लाहे. ॥
गंधपुष्पार्पणें लवलाहें । सौभाग्य राहे ।
सौगंध धूपदानें हो । दीपें कांती देहा ये ॥ १ ॥

नैवेद्यें सुख, सौख्यभोग । तांबूलयोगें लक्ष्मी लाहिजे लागवेगें ।
प्रसादसंगें । चौथा पुरुषार्थ घरीं रिघे, ॥
वंदितां सांग शिव जपानुरागें । अष्टैश्वर्यहि वागे. ॥ २ ॥

होमें भांडारा अभिवृद्धि । सर्वहि सिद्धी, ।
शिवभक्तां भुंजवितां विधि । पूर्णानंदीं भावें अर्पितां मनबुद्धि ॥
कैवल्यअवाधि । नाहीं, शिवराम आधीं । प्रगट हृदयामधीं." ॥ ३ ॥

ऐकोनि मैत्रेयिमुखें सुवाणी
ते गोष्टि भावें हृदयीं धरूनी ।
वंदूनि गेली अपुल्या गृहासी
अखंड पूजी शिवसांबजीसी. ॥ २ ॥

तों त्या नळाचा सुत इंद्रसेनु,
त्याचाच चंद्रांगद एक सूनु ।
पाचारुनी चित्रनृपें तयासी
कन्या विवाहूनि दिली सुखेंसीं. ॥ ३ ॥

नृप सकळ मिळाले त्याचिया उत्सवासी
बहुविध उचितासी अर्पिती दंपतीसीं; ।
मग नृपतिहि गेले सोहळे संपवूनी
श्वशुरगृहिंच तोही राहिला आवडोनी. ॥ ४ ॥

कितेक वर्षें असतां त्यासी । कोणे एके वेळेसी । चंद्रांगद निज-सख्यांसीं । नदी पाहयासि चालिला. ॥ २० ॥ तेथें नौका देखिली । माजी बैसला मित्रसमेळीं—, । नावाडे खेळविती जळीं । कुतूहळीं रायातें. ॥ २१ ॥ तों आवर्तामाजी जाणा । नौका भंवे तेच क्षणा, । कैवर्तांचें बळ चालेना । बुडाली जीवनामाजी तरी. ॥ २२ ॥ तंव कोलाहल कडकडाटीं । मोठा झाला दोहीं तटीं । ब्रह्मांडाची हों पाहे फुटी । शब्ददाटीं नभ दाटे. ॥ २३ ॥ कोणी बुडाले कितेक बुडती । कांहीं जळगृहीं सुंपती । कितेक दडाले महावर्तीं । झाली समाप्ति कित्येकां. ॥ २४ ॥ तों चित्रवर्मा भूपाळ । ऐकतां जाला शोकविव्हळ । यमुनातीरा आला तात्काळ, । दुःखें विकळ पडियेला. ॥ २५ ॥ ऐकतां त्या राजपत्न्या । दुःखानळ आंवरेना । सीमंतिनी धांवली जाणा । मूर्च्छागहना वरपडे. ॥ २६ ॥ प्रधानहि मुख्य मुख्य । पुरोहितेंसीं देशनायक । शोकसमुद्रीं सकळिक । पडले देख हाहाकारें. ॥ २७ ॥ इंद्रसेन त्याचा बाप । ऐकतां पुत्राचा लोप । पत्नीसीं करी शोकसंताप । मूर्च्छित धाप नावरे. ॥ २८ ॥ ते देशींचे मंत्रीजन । प्राणिमात्र ऐकोन । उर, शीर हाणिती आक्रोशून । आक्रंदमान हाहाकारें. ॥ २९ ॥ इकडे चित्रवर्म्याचें पुर । तिकडे इंद्रसेनाचें नगर । दुःखें क्षोभलें अपार । अनावर आवरतांही. ॥ ३० ॥ मग चित्रवर्मा आश्वासिला । हळु हळु नगरा आणिला । तों दुःख नावरे सीमंतिनीला । शांतवी तिला परोपरी. ॥ ३१ ॥ बुडालिया जामाताचे । बंधु आले होते संबंधींचे । और्ध्वदेहिक हातीं त्यांचे । करवी साचें तो राजा. ॥ ३२ ॥ मग ते नृपतीची सुता । भर्तारलोका जावों पाहतां । जनकें स्नेहें निवारितां । वैधव्यता पावली. ॥ ३३ ॥ वैधव्यदुःखें व्यापिली गाढी । तरी सोमवार व्रत न सोडी । सांबशिवातें चढावोढी । पूजी आवडीं ते बाळा. ॥ ३४ ॥ यापरी वत्सरीं चतुर्दशें । व्यापिली ते दुःखहुताशें । सांबशिवा ध्यात मानसें । तीन वर्षें काढिलीं. ॥ ३५ ॥

## सवाई.

येरिकडे सुतशोकपराभुत इंद्रसेन नृप भ्रांतचि जाला.
शत्रुंनिं वेढुनि सैन्य हिरूनि नृपाळ तिहीं मग स्वाधिन केला ।

तें अधिपत्य तिहीं बळकावुनि बांधुनि कारगृहीं रुधियेला
भूप सपत्निक तो मग तेथ कितेक दिशीं भ्रमितू कुजियेला. ॥ १ ॥

## चामरी.

तों त्या जळीं चंद्रांगद । जळीं घेत शोध । जातां तेथें देखे वृंद । नागलोकींच्या स्त्रिया. । त्या आल्या जळक्रीडेसी । देखतां नृपात्मजासी । सविस्मय निजालयासी । जात घेउनी तया. । तेथें भूपतिकिशोर । तक्षकाचें निजघर । पाहतां जीवीं अपार । पावला सविस्मया. । मणिगणीं तें जडित । फणिफणीं सेविजेत । इंद्रधामचि गमत । त्या भूपाळतनया ॥ १ ॥ नेला तक्षकसभेसी । तेथें देखे तक्षकासी । साष्टांग नमन त्यासी । केलें हो नृपात्मजें. । तेथील तेजें बुजत । धैर्य धरूनि ठाकत । तक्षक स्त्रियां पुसत । "कोण हे कोठिल कीं ?। त्या म्हणति "यमुनेसी । दिसतां आणिलें यासी । नेणों नामही रूपासीं" । तों तक्षक सहज म्हणे । "तुझा कोण ग्राम ? । कोणाचा तूं ? काय नाम ? । निर्भयेंच सांग काम । काय येथें रे तुझें ?" ॥ ४ ॥

" भूमंडळीं नैषध एक देशू
तेथील विख्यात नळ क्षितीशू ।
कोणी तयाची दमयंति जाया
पैं इंद्रसेनू सुत त्यासि राया. ॥ ५ ॥

मी जाण चंद्रांगद पुत्र त्याचा
माझा विवाहो जाला सुखाचा ।
कित्येक वर्षे श्वशुरगृहीं मी
होतों स्त्रियेस्नेहविषीं सकामी. ॥ ६ ॥

तों दैवयोगें यमुनेसि पोहतां
त्वत्सान्निधीं यांनिच आणिलें अतां ।
फळासि आलें मज पुण्य बापा
विलोकिलें म्यां तुज नागभूपा. ॥ ७ ॥

माझा समस्त पितृलोकहि धन्य आजी
निर्भीत येथ मिनलों तुझिया पदाब्जीं ।
जो तूं विजातिय जनांस कृतांतकाळ
तो जाहलासि मजलागिं जिवें कृपाळ." ॥ ८ ॥

ऐकूनि सुंदरहि निर्भय भूपवाणी
आनंदुनी फणि वदे मग त्या कृपेनीं ।
"तुम्ही पुजा करितसां कवण्या सुराची ?
तो देव सांग मजलागुनि निर्भयेंची." ॥ ९ ॥

पद.

भूपाळ बोले "भाइया ! त्या देवा पूजितों गा राया । सोडुनियां काया-माया । परमात्मपद पावावया. ॥ ध्रु० ॥ जो महादेवो स्वसुखा वोल्हावो सुखसंदोहो । ज्याचा प्रभवो कल्पीं ब्रह्मांडघनसमुदावो । नेणेचि भावा-भावो दुरि वारी गुणसंदेहो । ज्याचे वंदितां पावो विलयासि जाय मोहो. ॥ १ ॥ प्रकाशवासी सुखराशी । कैलासाचळनिवासी । जो असे पाशीं सुजनासी मूढा दूर विदेशीं । सर्वा भूतांसी साक्षी दाही करणांसी । धरीत गुणवैभवासीं । न मखे जो कांहीं गुणराशी. ॥ २ ॥ चैतन्यदेही हृदयीं सर्वांच्या जागे पाहीं । ज्याविण कांहीं बाहीं कोठेंही ठावचि नाहीं । ज्याचिया पायीं रतले जाती स्वर्गसुखाही । काळवेळाही ज्याच्या ठायीं न शिरे कांहीं. ॥ ३ ॥ देवाधिराजा गिरिजा ते साजे वामांगीं भाजा । मस्त-कांभोजा-वरि ते तळपते गंगा वोजा । सर्वहि काजा त्यजुनियां करितों त्याची पूजा । देहबुद्धिच्या माजा टाकुनि वृषभध्वजा. ॥ ४ ॥ कंठीं जयाच्या विष शोभे हार बरा रुंडांचा । गजराजत्वचा विलसे पासोडा पूर्ण तियेचा । जो भाविकांचा जिव्हाळा पुतळा चिद्रूपाचा । शिवरामीं पार ज्याचा न कळे चौं वेदां साचा." ॥ ५ ॥

ऐकोनि भूपसुतबोल अपूर्व चित्तीं
आनंदुनी फणि रते शिवराजभक्तीं ।
"बा तुष्टलों परिसुनी तुझिया सुवाचे
तूं बाळ तूज निजतत्व सुचे शिवाचें. ॥ १० ॥

हा लोक रत्नमय ह्या वनिता सुमेधा,
हे सौधवृक्ष अणि येथ नसेचि बाधा; ।
ये ठाइं रोगभय, मृत्यु कदापि नाहीं
तूं भोग भोगित यथेष्ट इथेंचि राहीं." ॥ ११ ॥

ऐकोनि राजसुत बोलत तक्षकासी
" येथें कदापि वसणें न घडे अम्हांसी ।
मी एक पुत्र जननीजनकांसि गेहीं
मत्प्राप्तिलागीं शिव पूजितसे सतीही. ॥ १२ ॥

माता बापहि मद्वियोगअनळें कीं वांचलीं, संपलीं?
मत्प्राप्तीस्तव ते व्रतस्थ युवती मेलीच कीं वांचली ? ।
भोगीशा चिरकाळ येथ वसण्या माझी नव्हे योग्यता
त्या ठायां करुणा करूनि मजला त्वां पाववावें अतां."॥ १३॥

हे ऐकोनि त्याची बोली । दिव्यदिव्यान्नें अमृतफळीं । अरोगवूनी आनंदमेळीं । दिव्य लेवविलीं भूषणें. ॥ ३६ ॥ नाना सुखभोगीं तोषविला। रायासि तक्षक बोलिला । "तूं स्मरसी मला । तेव्हां तुजजवळी मी असें" ॥ ३७ ॥ ऐसें बोलोनि मागुती । दिव्याश्व दिधला त्याप्रति । वस्त्राभरणेंही अमिती । देऊनि प्रीतीं गौरविला. ॥ ३८ ॥ एक राक्षस, आपुला सुत । दोघे दिधले साह्यार्थ । येरीं बोहडिला नृपनाथ । प्रीतीच्या बहुत वालभें. ॥ ३९ ॥ यापरी चंद्रांगद विलासी । सवें घेऊनि धनराशी । आरूढोनि दिव्य अश्वेसीं । त्या दोघांसीं निघाला. ॥ ४० ॥ आंतूनि निघाला बाहेरी । तों सीमंतिनी देखिली तीरीं । जे आली होती सोमवारीं । स्नानार्थ सुंदरी सखियांसीं. ॥ ४१ ॥ ते विलोकी नृपकुमरासी । जो सर्वांगसुंदर तेजोराशी । दिव्याभरणें मिरवे प्रकाशीं । दिशा सुवासी दिव्यगंधें. ॥ ४२ ॥ यकाकी देखतां तया । घाबरी थकित नृपतनया । दृष्टी तदाकार करूनियां । ठेली विस्मयाचेनि भरें. ॥ ४३ ॥ नृपपुत्रें तेही देखिली । पूर्वी पाहिलीसे गमली । मंगळसूत्र नसे कंठनाळीं । सोडी मोकळी वीरगुंठी. ॥ ४४ ॥ हळदकुंकुम नसे भाळीं । कृशांगी देखिली ते बाळी । उतरोनि आला तेचि वेळीं । पाचारूनि जवळी बोलतु. ॥ ४५ ॥

पद—( घाटी—तुकोबाची ).

" कोण तूं ? कोणाची सती ? । बाळत्वीं तुज काय खंतीं ? । ऐकोनि दुःखें लाजे सती । सखी बोले तयाप्रति. ॥ १ ॥ ' काय बा पुससी प्राण्या ? । प्रारब्ध न कळे कोण्हा । चंद्रांगदा हे अंगना । चित्रवर्म्याची हे कन्या. ॥ ध्रु० ॥ नाम इचें सीमंतिनी । पति इचा होता कोणी । लावण्यगुणाची खाणी । तो निमाला ये जीवनीं. ॥ २ ॥ पतिदुःखें वैधव्यता । तीन वर्षें कंठी आतां । आजि सोमवार येतां । आली आहे हे स्नानार्थ. ॥ ३ ॥ सासरा इचा भूपाग्रणी । आकळिला वैरियांनीं । बंदीं घातला बांधोनी । पडला आहे अजूनि. ॥ ४ ॥ तथापि, हे राजबाळा । पूर्ण पूजी चंद्रभाळा" । शिवराम प्रभुलीला । गातो ध्यातो वेळोवेळां. ॥ ५ ॥

सखीमुखें यापरि बोलुनीयां,
बोले सिमंतीनि स्वयेंच राया. ।
" तूं कोण गा कामविलास वाहसी ?
गंधर्व कीं किन्नर सिद्ध होसि ? " ॥ १४ ॥

व्हावेति हे काय नृपा तुझे उभे
तूं ह्रद्‌गता कां पुसतोसि वालभें ? ।
कीं देखिलें त्वां मजलागिं जाणसी
स्यांही पुरा देखियलाच भाससी. ॥ १५ ॥

तें सर्व सत्य मज सांग बरें नृपाळा "
ऐसें वदे दाटत बाष्प त्या गळां. ।
परस्परां दुःखाचि साहवेना
मोहें रडे प्रशमितां पण आवरेना. ॥ १६ ॥

चंद्रांगदें शोककारण । तें ऐकोनी तिचें वचन । मुहूर्तभरी राहिला मौन । चालिलें स्फुंदन आपणाहीं. ॥ ४६ ॥ नानापरी निपुण वचनीं । आश्वासिली नृपनंदिनी । म्हणे " आम्ही सिद्धाभिधानी । देव म्हणौनि प्रसिद्ध. ॥ ४७ ॥ आमुचें नाम सिद्धदेव " । स्नेहें तिसी बोठी राव । तों अंगांगीं पुलक दाटलें सर्व । स्पर्शलाघवें तयाच्या.

॥ ४८ ॥ मग कानीं तिचें उत्तर । " कोठें कीं देखिला निजभर्तार ? " । " तुझ्या व्रताचरणें तुष्टला फार । बहुधा शीघ्र येईल. ॥४९॥ दों, तीं, दिसां देखसी पुरुषा । तो शमवी तुझ्या शोका । हें सांगावया आलोंसे देखा । मी आहें सखा तव पती. ॥ ५० ॥ तेथें झणीं करिसी अनुमान । वाहातों शिवपायांची आण । हें हृदयीं ठेवीं राखोन । झणीं वचन प्रकाटिशी. " ॥५१॥ ऐसें ऐकतां ते सती । निवाली त्याच्या अमृतोक्तीं । संभ्रमें सुखावली वृत्ती । पाहे मागुती पुरुषातें. ॥ ५२ ॥ देखतां प्रेम दुणावत । वचनामाजि सुधा श्रवत । हास्यवदनें अंतरीं निवत । कटाक्षें चित्त भूलवी. ॥ ५३ ॥ स्पर्शतां धरूनि मज हातीं । अंगोअंगीं पुलक दाटती । पूर्वील लक्षण देखे सती । माधुर्यउक्ती सुस्वरें. ॥ ५४ ॥ वयप्रमाणादि अनुमानीं । निश्चय ते तर्कली नृपनंदिनी । म्हणे " हाचि माझा निजधणी । अन याहूनि तो नाहीं." ॥ ५५ ॥ प्रेमें दुणावत चित्त । याचे ठायीं आसक्त होत । परलोकींचा आलाहे येथ । केवळ तद्वत् कां दिसता ? ॥ ५६ ॥ हतभाग्य मज करंटिये । प्रियु दर्शन देईल काये ? । स्वप्न कीं हा भ्रमू आहे । सत्य होये हें मीळणी. ॥ ५७ ॥ कीं कोणी हा गंधर्व देव । करूनि आला कपटभाव । कीं मैत्रेयीचे गौरव । सत्य सद्भाव नव्हे कीं ? ॥ ५८ ॥ त्या व्रताचा नव्हे कीं प्रभाव । दशसहस्र वर्षांची अहेव । ऐसें बोलिला द्विजदेव । काय कीं देव जाणतू ? ॥ ५९ ॥ निमित्तें दिसती मंगळकारक । बोळलाच जरी गौरीनायक । असाध्य काये आहे एक ? । कृपाकौतुक शिवजीचें." ॥ ६० ॥ संशय गेले हृदयींचे । मुखांबुज जालें लज्जेचें । ऐसे जाणोनि भाव तीचे । बोले साच नृपपुत्र. ॥६१॥ "दुःखी तयाचीं जनकजननी । हा वृत्तांत सांगावया त्यांलागुनी । जाईन तूं जा वो साजणी । पती त्वरेनें पावशील." ॥६२॥ ऐसें बोलोनि वारू चढला । त्या दोघांसीं स्वदेशा आला । नगरा बाह्यवनीं राहिला । आंत धाडिला फणिपुत्र. ॥६३॥ तो म्हणे " दायादांलागुन । वेगें सोडा रे सिंहासन । राजा आलासे चंद्रसेन । पाताळाहून महाबळी. ॥ ६४ ॥ येथें कराल जरी अनुमान । तरी चंद्रांगदाचे तीक्ष्ण बाण । रणीं निर्दाळिती तुमचे प्राण । संदेह जाणा येथ नाहीं. ॥ ६५ ॥ तो यमुनाजळीं बुडाला । तक्षकमंदिरीं निघाला । तो फणींद्र केला आपुला । बाहेर आलाहे भूपती." ॥ ६६ ॥ ऐकोनि ऐसी

त्याची ख्याती। समस्त शत्रू मानवती । सत्वर जाऊनि पावविती। मायबापांप्रती वृत्तांत. ॥ ६७ ॥ दैवी प्रसाद पावोनी । आला आपुल्या ठिकाणीं । ऐकतां ते दचकले मनीं । भेटीलागोनि निघाले. ॥ ६८ ॥ ऐकोनि पुत्रागमन मात । आनंदलीं मायतात । चित्तीं सुखार्णव दाटत । धनीं तोषवित चारातें. ॥ ६९ ॥ मंत्री पुरोहित आदरें । अवघे जाऊनि सामोरे। प्रीती भेटूनि परस्परें । आणिती गजरें नगरांत. ॥ ७० ॥ मंदिरीं प्रवेशला नृपकुमर । आधीं वंदिले मातापितर । येरीं हृदयीं धरितां पुत्र। दाटे गहिंवर दोघांसी. ॥ ७१ ॥ क्रमें वंदी सर्वमाया। तिहीं आशिष केले तया । यथायोग्यें सर्वां भेटुनियां । संभावोनियां सुखी केलें. ॥ ७२ ॥

पद—'धाटी–दामाजीपंताच्या पदाची.'

शिवपूजेसि तेथें सभेसि बैसुनि नृपात्मज सांगे सर्व वृत्तातें । तक्षकमित्रें मणिगणभूषण दिधलें जें जें आपणातें ॥ जनकें ऐकुनि सर्व चरित्रही सुखें सुखावत निजचित्तें। म्हणे "हें तव सौभाग्य सुतें जिणें पूजिला शिव आर्तें. ॥ १ ॥ चंद्रचूड संतुष्टतां काय नोहे वो। ज्याच्या नामें सर्व मनोरथ होय वो." ॥ ध्रु० ॥ इंद्रसेनें स्वपुत्रवार्ता धाडिली मग त्या राया। राजा तो आनंदें भरला पाचारिली निजतनया। आलिंगुनि गहिंवरला दिव्यरत्नें भूषणें लेवउनियां । दों नगरांतहि उत्सव मोठा झाला सकळहि प्राणियां. ॥ २ ॥ चित्रवर्में जामाताला सहपरिवारेंसिं आणियलें । पुनर्विवाह करूनि विधीनें सीमंतिनीसिं वोपियलें। चंद्रांगदही भूषवी तीसी मणिगणीं जे फणिनें दिधले । ते मग शोभे दिव्यांगना मुक्तामय मणिगणजाळें. ॥ ३ ॥ चंद्रांगद तो परिवारेंसीं श्वशुरानें अनुमोदियला । पित्याबरोबरी वाजत गाजत गेला मिरवत नगराला। इंद्रसेनें तया राज्यीं स्थापुनि आपण विपिनाला । जाउनि शिव आराधुनि भावें गेला त्या शिवपदवीला ॥ ४ ॥ चंद्रांगद तो सीमंतिनीसीं राज्य करी निःशंकेनें । दहा सहस्त्रवर्षें तो शासी धरणी नीतीनें। पुत्राष्टक आणि कन्या एक ऐसीं पावे सुतरत्नें। देहातीतचि जाला पूर्ण शिमरामाच्या करुणेनें. ॥ ५ ॥

ऐसें सोमवार व्रतोत्तम । कथा सांगितली निरूपम । मागती सांगेन माहात्म्य । महिमा संभ्रमें सोमवारीं. ॥ ७३ ॥ हे ब्रह्मोत्तरखंडींची कथा । संक्षेपें सांगितली श्रोतां । नारायण स्वयें वक्ता । शिवरामदाता उदार. ॥ ७४ ॥

## इति श्रीब्रह्मोत्तरखंडे शिवकथावर्णनं नाम अष्टमोऽध्यायः.

### आरती.

जय देव जय देव जय दीनबंधो । माझें आरत पूरवीं सौभाग्यसिंधो । जीवें चंद्रांगद मोहे आवर्ती । पडोनि गेला तळीं अपुल्याच भ्रांतीं । वियोग पडला म्हणउनि त्याच्या वृत्ती । सीमंतिनिनें पुजिलें तुजला एकांतीं. ॥ १ ॥ मग इंदुवासरीं भावें तुज पुजितां । मरोनि चढला भर्ता तीचा तीहातां । स्वानंदें पावली सौभाग्यसमता । प्रकृतीपुरुषां जालें संमेलन आतां. ॥ २ ॥ पदपद्मां भजतां तूं जीवविसी वधुनी । ऐसी तुझी अभिनव अघटित हे करणी । पूज्यपूजकभावेंविण अंतःकरणीं । प्रकटसि शिवरामा तूं परिपूर्ण भरुनी. ॥ ३ ॥

### ललित.

सोमशेखर पूजितां । समभावें येतो हाता. ॥ १ ॥<br>
येणें संतुष्ट शिव होतो । सर्वांभूतीं भेट देतो. ॥ ध्रु० ॥<br>
त्रिगुणाचें बिल्वदळ । चरणीं वाहतां समूळ ।<br>
पूर्ण सबाह्य शिवराम । पाहतां निमतो विषयग्राम. ॥ २ ॥

॥ श्री सांबसदाशिवाय नमः ॥

पद्——( धाटी—धन्य दशरथ राय वो. )

हरहरा महादेव शंभो । चंद्रचूडा मानसीं तुझी मूर्ति बिंबो । तुझिया चरणासी माझें चित्त झोंबो । विषयीं विकळ मन, स्वरूप पाहुनि तुझें स्वसुख । पावोनि रमो भवभय विसरुनि. ॥ ध्रु० ॥ मन हें प्रसन्न तेंचि सोमवारीं । तुज भावें पूजीन सर्वभूतमात्रीं । तुझीं भूषणें लेईन सर्वगात्रीं । तुजहूनि वडिभरी अन कांहीं न देखुनी । निजसुखें जनीं वनीं विहरु निरंजनीं. ॥ १ ॥ करुणासागरा देवा आदिनाथा । माझीं कर्में त्वत्सुखें भरीं नित्य होतां । होईं गोचर माझ्या अक्षिपंथा । विफळ विकळ भवजलधी । तळमळ पावतों न कळे तुझें कुतूहल मज हें. ॥ २ ॥ आतां सर्वदा देईं हाचि धंदा । पूर्णानंदा प्रकटुनि सांगें पूर्ण बोधा । विस्मय विसरवीं माझ्या अक्षिवृंदा । सारुनियां कामधाम विसंबुनि रूप नाम । हेंचि इच्छी शिवराम नित्यानंद पद तुझें ॥ ३ ॥

ऋषी म्हणती "सुता । कौतुक परिसविलें आतां । तृप्तीच होईना चित्ता । कीर्तन ऐकतां शिवजीचें. ॥ १ ॥ सीमंतिनीच्या निष्ठेवरी । प्रेम बसलें सोमवारीं । यास्तव आनही त्रिपुरारी– । कथाकुसरी सांगावी. ॥ २ ॥ सुत म्हणे "ऐका निश्चयीं । द्विजोत्तम होता दिव्यदेही, । त्याचें नाम वेदमित्र पाहीं । वेदशास्त्रीं प्रवीण. ॥ ३ ॥ त्यासी जाला एक सखा । त्याचें नाम सारस्वत देखा । ते दोघेही एकमेकां । स्नेहसुखा अनुसरले. ॥ ४ ॥ दोघे एकनगरवासी । पुत्र झाले दोघांसी । सुमेधानाम वेदमित्रासी । सारस्वतासी सामवंतु. ॥ ५ ॥ दोघेही समवयें असती । दोघांची एक सहजस्थिती । संस्कारिले पितरीं प्रीती । श्रुतिशास्त्रार्थीं अभ्यस्त. ॥ ६ ॥ इतिहासादि पुराणें । तर्कमीमांसा व्याकर्णें । अभ्यासूनि दोघे सुमनें । समविद्येनें शोभती. ॥ ७ ॥ दोघांसि समरूप शिक्षा । दोघाची समान दीक्षा । देऊं बसती जेव्हां परीक्षा । देती हर्षा पितरांतें. ॥ ८ ॥ असाधारण त्यांची स्थिति । दोघांचे जनक सुखावती । कोणे एके वेळे ते पुत्रांप्रती । दोघे शिकविती बुद्धीतें. ॥ ९ ॥ "तुम्ही षोडशवर्षांचे दोघ । विद्यापारंगतही

सांग । विवाहसमय समयोग । तुह्मां निजांगें आलासे. ॥ १० ॥ दोघीं राजापाशीं जावें । विदर्भराया विद्यावैभवें । तोषवूनि धन मेळवावें । लग्न बरवें करूं तुम्हां." ॥ ११ ॥ ऐकतां दोघेही गेले । विद्येनें रायातें तोषविलें । लग्न आमुचें पाहिजे जालें । राया जाणविलें मनोगत. ॥ १२ ॥ त्यांचा जाणोनि मनोरथ । हांसिनला विदर्भनृपनाथ । सहज बोलिला किंचित । सावाचित्त अवधारा. ॥ १३ ॥ चंद्रांगदाची सती येथ । सीमंतिनी नाम विख्यात । सोमवारीं अंबायुक्त । शिवातें पूजित सद्भावें. ॥ १४ ॥ ते दिनीं ते राजसती । भावें पूजिते दंपती । धनही देते अपरमिती । गौरीपतीप्रीत्यर्थ. ॥ १५ ॥ यास्तव तुम्ही दोघे निश्चितीं । एकें धरूनि स्त्रीवेषाकृती । एकें होऊनि तिचा पती । जावें दंपतीस्वरूपें. ॥ १६ ॥ जाऊनि सीमंतिनी गृहासी । घेऊनि दंपतीपूजेसी । लाहोनि यथेष्ट धनराशी । यावें मागुती मजपाशीं." ॥ १७ ॥ ऐसें रायें आज्ञापितां । ते कुमार म्हणती "नृपनाथा, । ऐसें कपटकर्म करितां । आम्हां सर्वथा भय वाटे. ॥ १८ ॥

## पद.

देव गुरू राजयासी । कपट जो करी दोषी । उघड तो जाय निरयासी. ॥ १ ॥ राजया रे तेव्हां कल्याण कैंचें? ॥ ध्रु० ॥ कपटें राजालयाला ॥ गुपितें यद्यपि गेलिया । कदाचित् प्रकट जालिया. ॥ २ ॥ बहुविधा कळाभ्यासी । आतळल्या कौटिल्यासी ॥ दुःशील ते सर्वहि गुणराशी. ॥ ३ ॥ पाप जऱ्ही न करी । कपटातें अनुसरी ॥ तरी तो नरकाचा अधिकारी. ॥ ४ ॥ आम्ही पूर्ण सद्वंशींचे । दास शिवराम प्रभुचे । नोहे नोहे उचित आमुचें." ॥ ५ ॥

राजा म्हणे "बाप हो । देवगुरू पितर वो । इतुक्यांच्या आज्ञाप्रभावो । प्रत्यवायो चुकवितां. ॥ १९ ॥ देवराज पितरानुमतें । भिऊनि करितां शुभाशुभातें । तें तों बाधिना तयातें । न करितां तें प्रत्यवायो. ॥ २० ॥ यालागीं आम्ही राजे । प्रजाजन तुम्ही माझे । आज्ञा करितां आश्रयेचि सहजें । येऱ्हवीं भिजे पापासीं. ॥ २१ ॥ तुम्ही दोघे मिळून । माझें करावें शासन" । राजभयें तिहीं 'बरें' म्हणून । नृपवचन अंगिकारिलें. ॥ २२ ॥ रायें

सारस्वताचा सुत । बायको केला सामवंत । वस्त्रालंकारीं भूषित । नेत्र टवटवीत काजळीं. ॥ २३ ॥ कृत्रिम केश, स्तनबंधन । करूनि भूषणें लेऊन । वस्त्रालंकारीं शोभायमान । प्रमदारत्न मानवलें. ॥ २४ ॥ दोघे राजाज्ञेवरुनी । चालिले दंपती होउनी । जें होईल तें हो म्हणोनी । नैषधपाटणीं पातले. ॥ २५ ॥ तेथील दंपतीसोमवारीं । त्यांसि रिघोनि राजमंदिरीं । कर चरण क्षाळुनि बरी । आसनावरी बैसली. ॥ २६ ॥ तंव ते बाळा सीमंतिनी । दंपती बैसल्या वरासनीं । प्रवर्तली त्यांचे पूजनीं । प्रत्येक पाणी सद्भावें. ॥ २७ ॥ तों त्या दोघां देखती । जाणोनियां कपटदंपती । हांसोनि गौरीहरमतीं । प्रेमें पूजिती ते जाली. ॥ २८ ॥

द्विजांत आव्हाहुनि शंकरातें
तत्पत्निते भाउनि अंबिकेतें ।
गंधाक्षता धूपदिपादि नाना
सर्वोपचारीं पुजिते प्रवीणा. ॥ १ ॥

देऊनि षड्रस सदन्न सुवर्णपात्रीं
दध्योदनांत घणिचें विविधोपचारीं ।
स्थानींच विप्र बसले कर धोउनीयां
तांबूल दे सकळ दंपति वंदुनीयां. ॥ २ ॥

दे दक्षिणाधनहि, भूषण, वस्त्र, गाई
वंदूनियां बहुडलें पुरुषां, स्त्रियांही. ।
दोघे कुमार पुजिले शिवशक्तिबुद्धी
ते दोघेहि निघति बाहिर तेच संधी. ॥ ३ ॥

जो पूजिला गिरिसुता च म्हणोनि तीनें
तो बाइकोच जाहला दृढ भावनेनें; ।
पुंभाव विस्मरुनि त्या अपुल्या सख्यासी
बोले अनंगवश होउनियां विलासी. ॥ ४ ॥

"कोठें प्रिया पण विसंबुनि चालिलासी,
मी सुंदरी सति तुझी मज पाहिनासी; ।

जाऊनि रम्य तरुपुष्पितया वनासी
तूशीं रमूं म्हणुनि वाटतसे जिवासी." ॥ ५ ॥

पद ( राग–परज ).

तो सुमेधा तिचें वचन ऐकुनी । जात विनोद विनोद मानुनी । ते पुन्हां बोले "कां गा उपेक्षिसी, । विरह न साहवे माझे मनीं." ॥ १ ॥ सुमेधा मनीं धाक लाहे ॥ ध्रु० ॥ "आलिंगुनि मज अधरसुधा पाजीं । स्मरशर बाधी मजला रे." । मागें मागें ऐसें बोभात जाय; । ऐकतां त्या तियेच्या बोला ॥ २ ॥ मग म्हणे " म्यां देखिलें ऐसें ऐकिलें, नाहीं, । हे कैंची सगुण योषिता; । शिवरामभक्त सखा पूर्ण हा माझा निःशंक पुसों इसी आतां. ॥ ३ ॥

चामरी.

"कोण तूं सये अपूर्वबाइकोचि सारिखी । भुलोनि बोलतेसि होय सावधान अंतरीं, । पुराण वेद जाणता अतींद्रिय व्रतस्थ तूं । सारस्वतात्मज स्वयें भुलिसि टाकि तूं दुरीं". । पुन्हा वदे "सख्या नव्हें पुरुषसंशयो तुजला असे तरी । विलोकिं आपुले करीं". । स्वलक्षणासि दावितां । अकृत्रिमचि योषिता । विलोकितां विकारिला अमोप मन्मथाकरीं ॥ १ ॥ पुन्हा विवेकजीवनीं । स्मरानळासि वारुनी सुमेध तो मुहूर्त एक विस्मयें ठकावला. । उगाचि राहतां सुमेध ते वदे पुन्हा सती, "तुझा समस्त संशयो आतां तरी निवर्तला? । अतां झणीं करीं विलंबु, ऊठ तूं रमावया, प्रशस्त या वनस्थळीं करूं विलास आपुला "। असें अतर्क्य देखुनि विचित्र बावरा मनीं सुनीतिची गिरा सुमेध त्या स्त्रियेसी बोलिला. ॥ २ ॥

पद (राग–परज).

"बापा, सावध होईं । आपणां पाहीं. ॥ ध्रु० ॥ आम्ही तुम्ही मित्र अधीत श्रुतीं शास्त्रार्थविवेकी रे, । मोहमदांधापरि वदशी तूं, हा उपहासचि लोकीं. ॥ ॥ १ ॥ बा, तूं स्त्री ना पुरुष नव्हेसी पाहे आपआपणांसी । हे चेष्टा जरि पितरें ऐकति थोर अनर्थ जिवासी. ॥ २ ॥ पितरां न कळत धूर्त नृप-उपदेशा मिळालों रे,। एवढें अनुचित घडलें आम्ही केलें फळ पावलों. ॥ ३ ॥ तूं विप्रात्मज सामवंतु निंद्य कसें तुज आलें रे ? । घर पाके तों उगीच येईं

पूजीं शिवपाउलें. ॥ ४ ॥ देवद्विजकरणीनें तुझी स्त्रीतनु जाइल वेगें । नातरि पितृआज्ञेनें विधिनें वरीन तुजला सांगें. ॥ ५ ॥ काय कुतूहल मायिक मोठी निष्ठा त्या राणीची ". । ऐसें बोले तों ते बाळा चुंबी धरुनि सर्वेचि. ॥ ६ ॥ दाटुनि आलिंगुनि घर्षियला विप्रसखा गुणराशी । शिवरामप्रभु चिंतित पूर्ण पावेना विकृतीसी. ॥ ७ ॥

यापरी बोलत चालत । घरा आणिला यथाकथंचित, । पितरांपाशीं तो वृत्तांत । सर्व आद्यंत सांगितला. ॥ २९ ॥ ऐकतां एवढा अनर्थमूळ । पितर दोघे शोक विव्हळ । नृपापासीं आले तात्काळ । कोलाहल करितचि. ॥ ३० ॥ सारस्वत म्हणे " राया । अवस्था पाहें माझ्या तनया; । काये आज्ञा करूनियां । कोणा ठाया धाडिलें? ॥ ३१ ॥ हें तंव तुझें आज्ञापित, । कर्म केलें अतिनिंदित; । यालागीं केलें फळ भोगित । पुत्र स्त्रीत्व पावला. ॥ ३२ ॥ माझी संतती नासली थोर, । आजि नष्टले माझे पितर, । अपुत्र्या मज नसे लोकांतर, । पिंडादि संस्कार मग कैंचे? ॥ ३३ ॥ गेली गायत्री देवता, । नसे स्नानसंध्या जपवार्ता, । स्त्रीदशा आली माझ्या सुता । काये आतां गती यासी? ॥ ३४ ॥ तुवां माझी संतती नाशिली, । देवलोकींहुनी च्युत केली, । एकुलती एक संतती भली । कोण्या लाविली गतीसी!" ॥ ३५ ॥ सारस्वतवचनें समर्थें । ऐकोनियां भीमकोत्तमें । सीमंतिनीनिष्ठा निःसीम । जाणूनि परम ठकावला. ॥ ३६ ॥

## सवाई.

मग सर्वऋषींसि सभेसि बोलाउनि प्रार्थितसे पुरुषत्व तयांसी;"
ते म्हणती, " शिवसेवककल्पित तें विपरीत नव्हेचि शिवासी. ।
घेउनि त्यांतिल एक मुनीश्वर ते द्विजपुत्र सहीत तयांसी
सत्वर चालत राजशिखामणि जेथ भवानि वसे गिरिशेंसीं. ॥ १ ॥

भारद्वाज योगी तयाच्या प्रबोधें
नृपू बैसला तेथ चित्तावरोधें; ।
तया देउळीं तीं दिशीं निर्विशेषीं
महत्साधनीं तोषविलें शिवासीं. ॥ ६ ॥

प्रकटुनि निज अंबा बोलिली राजयासी
"बहुतचि शिणलासी, काय बा मागतोसी?" ।
नृप म्हणत "ययासी माय, पुंभाव द्यावा,
निजवरद तुकेंचि आजि संपूर्ण व्हावा." ॥ ७ ॥

रायासि विश्वजननी करुणेनि बोले,
"मद्भावि कीं सहज जें गुणकर्म केलें, ।
तें अन्यथाचि करणें नवजेचि कोणा,"
ऐकोनि मागत पुन्हा वरदोक्ति राणा. ॥ ८ ॥

" माय वो याला पुत्र एक । तोही, नष्टला निःशेख; । हा सारस्वत टाकुनी शोक । केविं सुख पावेल?" ॥ ३७ ॥ देवी बोले " मत्प्रसादार्थ । आणिक यासी एक होईल सुत । विनयेंसीं सर्वविद्यावंत, । आयुष्यवंत शिवभक्त. ॥ ३८ ॥ आतां हे सामवंतीरमणी । सुमेधा द्यावी विवाह करुनी । यथाकामें दोघें मिळोनी । सुखें अनुदिनीं वर्तत. "॥ ३९ ॥ बोलोनि पावली अंतर्धान । मग तो राजा ब्राह्मणीं मिळून । गौरीचें केलें आज्ञापन । स्वस्वस्थान पावले. ॥४०॥ तो सारस्वत गौरीवचनीं । पुत्र पावला विश्वासुनी; । तो अति प्रवीण पहिल्याहूनि । सर्व लक्षणीं संपन्न. ॥ ४१ ॥ ते सामवंती दिधली सुमेधासी, । ते दंपती नांदती विलासेंसीं, । अखंड पूजिति सांबशिवासी । काळ सुखेंसीं कंठिती. ॥ ४२ ॥ हा सीमंतिनीचा गौरव, । शिवपूजेचा प्रभाव; । आतां शिवभक्तांचें विशेष वैभव । श्रोते हो सर्व अवधारिजे. ॥ ४३ ॥ लक्ष्मीनारायणा शरण । हें सोमवारशिवपूजावर्णन; । आतां शिवभक्तांचें महिमान । कथा सांगेन स्वानंदें. ॥ ४४ ॥ लक्ष्मीनारायण समर्थ । पूर्णानंदरसभरित । कथा चालवी अद्भुत । शिवराम निमित्त करूनियां. ॥ ४५ ॥

## इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे नवमोऽध्यायः ॥

## आरति.

जय देव जय देव जय चंद्रचूडा ॥ भजनमात्रें वळसी स्वसुखें जडमूढां. ॥ ध्रु० ॥ प्रकृतिपुरुषरूपें तुज एका भजती । देहाचे विकार

त्याला सहसा नातळती. ॥ दों तीं पांचांमाजि यद्यपि ते दिसती । न मखत त्या गुणकर्मी तुज मिळुनी असती. ॥ १ ॥ कपटभावें तुमचें मेहुण हो जातां, ॥ पडला मोठा चिरा कपटाचे माथां. ॥ मेहुण अनुभउं लागे एकात्में सुखता । प्रकटे अंतर्बाह्य तैशी ते समता. ॥ २ ॥ ऐशी सर्वगतेचीं सीमा आकळली । तेची सीमंतिनी तुजला आवडली. ॥ पूर्णानंदें भजनीं भवनिधि ते तरली ॥ ओळखुन शिवरामातें तव चरणीं जडली. ॥ ३ ॥

## ललित.

सोमवारीं महादेव । पूजितां तुष्ट तो सावेव, ॥ १ ॥
धरा शिवपूजेची निष्ठा । रूढे शिवभक्तांत प्रतिष्ठा. ॥ ध्रु० ॥
जगीं शिवभक्ती वांचुन । नाहीं तिसऱ्याचें भान. ॥ २ ॥
पूर्ण शिवरामा भजत । सहजें व्हाल वर्त्तगत. ॥ ३ ॥

नवमोऽध्याय आरती ललित समाप्त.

॥ श्रीसांबाय नमः ॥

# शिवभक्तमहिमा.

## भद्रायुचरित्र.

पद—( धाटी—धन्य दशरथ माय वो ).

कैलासवासिया, रे शिवराया । नित्यानंददायका, वारीं गुणमाया. । ठाव दे तुजपाशीं तव पायां । आलों जवळि देहात्मभाव त्यजूनियां. ॥ ध्रु० ॥ तुझी अघटितैश्वर्यविभूती । माझ्या भाळीं करुणेनें लावीं निजहातीं. । तेणेंही भूतें मज सोडुनि जाती, । माझीं करणें सावध देवा, मग होती. ॥ १ ॥ अगुणीं तुज ऐसा नाहीं गुणिया रे, । भूतबाधा मारिसी निकट परिचारें, । तुझ्या करणेचें लागो मज वारें; । झणीं आतां वारिसि मातें परभारें. ॥२॥ पूर्णानंदकंदा त्रिपुरारी, । हृदयस्था भेटी धणीची सुखकारी; । निववीं अंगांग बोधामृतधारीं, । तुझा दास शिवराम लोळे महाद्वारीं. ॥ ३ ॥

श्रोतीं व्हावें सावधान. । विचित्र शिवाचें महिमान, । शिवभक्ताचा महिमा गहन, । परम पावन शिवकथा. ॥ १ ॥ अवंतिदेशीं ब्राह्मण । एक होता मंदराभिधान, । स्त्रीजित, शिश्नोदरपरायण, । संध्यास्नान वर्जित. ॥ २ ॥ कुमार्गी आसक्त, रत कुस्त्रियेसीं, । जैसा अजामिळ पापराशी, । तो पिंगला नामें वेश्येसीं । दिवानिशीं रमतसे. ॥ ३ ॥ सर्वदा असतां तिचे घरीं, । कोणी एके वेळेवरी । ऋषभ शिवयोगिया भाग्यें तरी । तेच मंदिरीं ठाकतु. ॥ ४ ॥ स्वपुण्यचि आलें मूर्तिमंत, । ऐसा देव तो मुनिनाथ; । दोघेंही तयातें पूजित । बैसवूनि स्वस्थ सुखासनीं. ॥ ५ ॥ चरण क्षाळूनि नवोदकीं, । तीर्थ वंदोनि निजमस्तकीं, । नमस्कार अर्घ्येंसीं विवेकीं । गंधपुष्पादिकीं पूजिला. ॥ ६ ॥ सर्वोपचारीं पूजन, । जेवूं घातलें मिष्टान्न, । विडिया देती दोघेंजण । पादसंवाहन मग करिती. ॥ ७ ॥ यापरी शिवयोगी पूजिला । सर्वोपचारीं तुष्टविला । एक रात्रि क्रमोनि उठिला । तेथुनि चालिला प्रभातें. ॥ ८ ॥ काळांतरें दोघें मेलीं । वेश्या स्वकर्मगती पावली । तो ब्राह्मण आणिला कर्ममेळीं । भूमंडळीं जन्मासि. ॥ ९ ॥ वज्रबाहु रायाची महिला । सुम-

मतीच्या गर्भा आला, । तें न देखवे त्या सपत्न्यांला; । घातलें तिला विख त्यांनीं. ॥१०॥ सपत्नीस गरळ देतां, । दैवें न मरेचि ते योषिता । अत्यंत पावली दुःखावस्था, । मरत मरतां वांचली. ॥ ११ ॥ वेणा लागतां काळांतरीं, । पुत्र प्रसवली सुंदरी, । विष झोंबलें शिशूच्या शरीरीं । तें आक्रांत करी अति दुःखें. ॥ १२ ॥ शिशू आणि ते सुंदरी । विखें फुटला वर्ण शरीरीं; । राजा मग वैद्याचे करीं । करवी परोपरी चिकित्सा. ॥ १३ ॥ गुण नयेचि, दिवाराती । .................................. । ............................ । दोघें चरफडती अतिदुःखें. ॥ १४ ॥ मरोनिही न मरती, । जिवंतही सुख न देती, । देखोनि पत्नीपुत्रगती । राजा पत्नी उबगलीं. ॥ १५ ॥ दुःखें रडतां अहोराती । घडिभरी सुखें निजों न देती, । जिण्या, मरण्याची न दिसे गती । पापमूर्ती दुरात्मे. ॥ १६ ॥ शीघ्र सुटे यांची संगती, । ऐसा उपाव करी निगुती, । सपत्न्यांस आसक्त चित्तीं, । रायें युक्ती चिंतिली. ॥ १७ ॥

पद—( काफी–घाटी पाहे वर्म त्या मुलाचें. )

पाचारुनि सांगे सारथ्याला, " नेउनि याला दुरी ।
टाकुन ये रे झडकरी सुता घोर वनामाझारीं. " ॥ १ ॥

कर्म सुटेना, शिव शिव ! कर्म सुटेना हो, ।
राजा हो आणिक रंक, तथापि जोंवरि आहे देहो. ॥ ध्रु० ॥

दोघां मग तो टाकुनि गेला, ।
ते तंव बाळकजननी ॥
कडिये घेउनियां जातां पदोपदीं अडखळोनि पडे धरणी. ॥ २ ॥

मुक्त केश, अति उष्ण तपें तनु कांव्यावरी उलंडे हो, ।
घालित उच्छ्वास भोगी कर्मदुःखें प्रचंडें हो. ॥ ३ ॥

व्याघ्रवृकादिक ब्रह्मराक्षसांसि दुःसह गर्जन करितां, ।
घाबरि बोरांटीवरि पडतां खोंचे ते नृपवनिता. ॥ ४ ॥

रानोरानीं जातां दैवें लागे पूर्ण पथासी, ।
शिवरामप्रभुपूर्णकृपेनें पावेल स्वसुखासी. ॥ ५ ॥

## श्लोक.

तों तेथ वैश्यनगरी अति रम्य वाटे,
नारी नर स्थिरचरीं समुदाय दाटे. ।
तेथील भूमिपति पद्मकराभिधानी,
तें देखतां नगर ते सुख फार मानी. ॥ १ ॥

दासी तयाचीच नृपांगनेतें,
देखोनि आली जवळी तियेतें. ।
पुसोनि तीच्या सकळ वृतांता,
नेऊनि ते भेटविली स्वनाथा. ॥ २ ॥

त्यानें तिचें दुःख समस्त पाहिलें,
एकांत नेऊनि तियेसि पूशिलें; ।
तिनें नृपा सर्व वृतांत वर्णिला,
ऐकोनि हाहेतिमुहूर्त ठाकला. ॥ ३ ॥

कळवळुनि नृपानें मंदिरामाजि नेली,
बहुविध उपचारीं मातृवत् पाळियेली; ।
पण व्रण उभयांचा औषधींनीं शमेना,
सुत मग विधियोगें पावला मृत्यु जाणा. ॥ ४ ॥

दुःखें नृपाळवनिता मग मूर्च्छिनेली,
होऊनि सावध रडे, करडें अरोळी. ।
ते नावरेच जरि आंवरली स्त्रियांनीं,
दुःखें हणी उर शिरा प्रलपोनि पाणीं. ॥ ५ ॥

" हा तात राजकुमरा, कुलपूर्णचंद्रा,
प्राणप्रिया, गुणनिधी, सखया पवित्रा, ।
टाकूनियां मज अनाथ प्रसूसि बाळा,
तूं चालिलासि कुमरा, कवण्या स्थळाला ? " ॥ ६ ॥

ऐशी प्रलाप करिते जंव ते कृशांगी,
तों तेथचि प्रगटला शिवराज योगी. ।

अत्यादरें नृपातिनें पुजिलें विधानीं,
येऊनि तींजवळी बोलत मंद वाणीं. ॥ ७ ॥

"कासया रडसी बाळे, । कोण उपजलें। कोण मेलें? । शरीरचि लटिकें समूळें । खरीं भ्रम बाळे, वाहती. ॥ १८ ॥ भ्रांती उपजती, निमती । जळीं फेणाचिये रीतीं; । येथें अवकाश नाहीं शोकाप्रती । व्यर्थ खंती करिसी कां? ॥ १९ ॥ गुणयोगें भूतें सृजती, । कर्में संस्कारीं भ्रमती, । काळें मग वोढिले जाती, । वासनेंन शिरती संस्कारें. ॥ २० ॥ सत्व, रज, तम तिन्हीं गुण । मायेनें उत्पत्ती पावोन, । तेच करिती देहनिर्माण । मायालक्षणें आश्रयी. ॥ २१ ॥ सत्वगुणीं होती देव, । राजसें होइजे मानव, । तामसें पाविजे पशुत्व, । वासनास्वभाव अनुसरोनी. ॥ २२ ॥ पडोनि कर्मबंधना खोडा, । संसारीं भ्रम धडफुडा, । दुःखसुखाचिया प्रौढा । अति अवघडा पावतसे. ॥ २३ ॥ तैं कर्म न चुके देवासी, । मा येरांची गती कायशी? । अनेक दुःखांचिया राशी । निजकर्मैंसीं भोगिजे. ॥ २४ ॥ कोणी एक विचक्षण । काळचि म्हणती देहकारण । कोणी कर्म कोणी गुण; । असाधारण हा देहो. ॥ २५ ॥ काळकर्म गुणाधीन, । पंचां भूतांचें हें वपु जाण; । याच्या भयनाशातें देखोन । संत जन तेवीं करिती. ॥२६॥ हें झालें अव्यक्तामाझारीं, । लपतें अव्यक्ताचे भीतरीं, । मध्येंच दिसे व्यक्तापरी । जैसें नीरीं बुद्बुद. ॥ २७ ॥ जेव्हां गर्भीं संभवला, । तेव्हांचि तो प्राणी मेला; । दैवेंकरूनि वांचला, । मागुती लया पावतु. ॥ २८ ॥ कोणी गर्भींच निमती, । कितेक जन्मतांचि खचती, । आणिक यौवनीं पुरती, । दैवें जगती वार्धक्यें. ॥ २९ ॥ जैसें कर्मप्राक्तन; । तैसेंच देह पावतो जाण; । तदनुरूपें सुखदुःखपण, । भोगी आपण हे देहीं. ॥ ३० ॥ नवल मायेचेनि विलासें । रतिसंगें देह उपजत असे । स्त्रीपुरुषक्लीबविशेषें । कर्मवशें आपुलिया. ॥ ३१ ॥ आयुष्य पुण्यपापादिक । विधिलिखित हें अचूक, । भ्रमें आपण यांतून देख । जन्मदुःख भोगीतु. ॥ ३२ ॥ कर्म नुलंघवे सहसा, । न गणवे काळफांसा, । देहादि भावनांहीं भरंवसा, । शोक कासया तूं करिशी? ॥ ३३ ॥

## चामरी.

स्वप्न कैंचा स्थीर, । इंद्रजाळअवडंबर लटिकेंचि, हें शरीर जाण तेंवि नाथिलें, । कोटि कोटि जन्म जाण कितेक वो गेले होत, आपणांसि नोळखून व्यर्थ भुलीच्या बळें; । किते कितेकांचि माया, किते कितेकांचि जाया, कोण कोणाची तनया, जालीसि वो वेल्हाळे, । पंचभूतमय देह मांस, त्वचा, मज्जामय विष्ठापुत्राचेंचि गेह । काय येथें आगळें ? ॥ १ ॥ दुजी तरी जाली तनू, देहाचेंचि मळ जाण, पुत्र कैंचा? मूढपण लटिकेंचि वाहसी. । बहू धरूनिहि यत्न मृत्यु जिंकितेचि जन, तरी मागील सज्जन ते जिते कां देहासी ? । तप, विद्या, बुद्धि, मंत्रु, रसायनौषधी करुन मृत्यु, जिंति ऐसा नरू कोणी नाहीं पृथ्वीसी; । एक उद्यां, एक आजि, परवां एक ते सहजि अनित्य, शरीरामाजि कां ममत्व धरिसी ? ॥ २ ॥

उरीं मृत्यू उभा आहे, । प्राण्या येथें सुख काये ? । वाघापाशीं उभा ठाये । पशू, तृणें कैंवि चरे ? ॥ ३४ ॥

## पद. ( धाटी—तुझे चरणीं मन लागो रे ).

तरी सुमतीं वो सदा शिव ध्यायीं निजभावें. ॥ ध्रु० ॥ जन्ममृत्यु जरि बोधें त्वां जिंकावे. ॥ १ ॥ चित्त निर्मळ हें तुझें जरि व्हावें, ॥ २ ॥ जन्म जरा भय निर्मूळुनि जावें, ॥ ३ ॥ शिवरामपूर्णपद हाता यावें ॥ ४ ॥

## श्लोक.

तंववरि भय आहे जन्मवार्धक्ययोगें,
जंव शरण न जाये श्रीशिवालागिं अंगें; ।
अनुभवित श्रमातें वीट येईल जेव्हां,
..................................... ॥ ८ ॥

शिवामृतकथा पितां विषयहेत होईचिना,
विराग स्वसुखें, कदा इतर रंग नाणीं मना ।
अखंड शिवसागरीं बुडूनि पोहतु निर्भयें,
तरी मरणजन्म हे शिवति ना तया निश्चयें. ॥ ९ ॥

याचि हेतु तुझें मन । शिवध्यानाचेंचि साधन, । शोक मोह अनुसंधान । तूं टाकून शिव भजें. " ॥ ३५ ॥

पद—( धाटी—या रावणानें ).

ऐसें ऐकुनि वदली ते " मृतपुत्राविण मी येथें । येकट ठेउनि माझ्या देहातें ॥ १ ॥ स्यां काय कीजे? ॥ ध्रु० ॥ गोत असुनि मज काय ?। मरणेंविणें मज वांचुनि मोहो. ॥ २ ॥ पूर्ण स्मरें मीं या शिशुसी, । मुकलें शिवरामप्रभुशीं, । भार बहुत मी झालें धरणीसी. ॥ ३ ॥

ऐशा मज हतभाग्येंसि जाण । मरणेंविण गती नसे आन; । पण रे तुझे देखिले श्रीचरण । यालागीं धन्य मी जालें. " ॥ ३६ ॥ ऐकोनि ऐसी तिची बोली । शिवयोगिया दयेतें कवळी, । पूर्वोपकार स्मरोनि बळी । त्या मृताजवळी पातला. ॥ ३७ ॥ शिवमंत्रीं भस्म मंत्रीं । मुलाच्या घातलें वक्रीं । बाळ जीवविलें क्षणाभीतरीं, । प्राण शरीरीं चेतविले. ॥ ३८ ॥ तों बाळ उघडी नयन, । सर्वेंद्रियां जालें चैतन्य, । करूं लागले मग तें रुदन । स्तनकांक्षेन तेधवां. ॥ ३९ ॥ मृत बाळ मागती उठिला, । नगरजना विस्मय जाला; । राजा तरी अति आनंदला । शिवयोग्याला देखतां. ॥ ४० ॥ विस्मयते राजांगना । अंकीं बाळ घेतां जाणा, । स्नेहें दाटला पान्हा, । बाष्प लोचना थोकले. ॥ ४१ ॥ बाळ घेउनी पोटेंशीं । परमानंदें निवाली कैशी? । नेणे आपणा किंवा परासी, । सुषुप्ती जैसी श्रमयोगें. ॥ ४२ ॥ पुन्हा तो ऋषभ योगेश्वर । त्या शिशुमायेचें शरीर । कुष्ठवर्णांकित समग्र । भस्मकरें अभिमंत्री. ॥ ४३ ॥ त्या भस्मस्पर्शप्रसादें जाण । दिव्यदेह ते आपण, । दिव्यकांतीनें दैदीप्यमान । देवासमान शोभलीं. ॥ ४४ ॥ पुण्यकर्माच्या अभ्युदयीं । स्वर्गराजा जो संतोष होय, । त्याहूनि शतगुणिये । आनंद लाहे तत्काळें. ॥ ४५ ॥ मग धरूनि चरणा लागली, । प्रेमें सुधारसीं भीनली, । बोले मंजुळी बोलीं । शिवयोगी. ॥ ४६ ॥ "ऐकें राणिये राजसे, । चिरंजीव बहुत वर्षें, । जोंवरी वांचसी निर्विशेषें । जरालेश नाकळसी. ॥ ४७ ॥ हा जो तुझा पुत्रोत्तम, । भद्रायु ऐसें याचें नाम । लोकीं प्रसिद्ध होईल परम । स्वराज्य सुगम पावेल. ॥ ४८ ॥ या वैश्याचिया नगरीं । तंववरी राहें

वो सुंदरी, । हा कुमार स्वयें झडकरी । विद्या जंववरी अभ्यासी. ॥ ४९ ॥ यापरी शिवयोगिया येथें । सुखें चालिला स्वदेशातें, । दोवें जीववुनी भस्मसामर्थ्यें । गात शिवातें स्वानंदें. ॥ ५० ॥ हे कथा परम पावन, । भद्रायूचें संजीवन, । भावें जे ऐकती जन, । पावती पूर्ण आयुष्या. ॥ ५१ ॥ श्रीलक्ष्मीनारायण सुखदाता, । शिवराम स्वयें वक्ता, । म्हणोनि निःशंक चालिली कथा । तुम्हां श्रोत्यांचेनि धर्मे. ॥ ५२ ॥

## इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे शिवभक्तमहिमावर्णनं नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥

## आरती.

जय देव, जय देव, जय काळांतका, । आरत बहु पहाया आहे तुज एका. ॥ ध्रु० ॥ तुझ्या विभूतीची अभिनव ते रक्षा, । सर्वत्र प्रगटवी तुझी समवीक्षा, । ते मज भाळीं लाउनि द्यावी शिवदीक्षा. ॥ १ ॥ मेले ते जिववीसी पीयूषधारीं, । जीवें भावें झाले तें घायेंविण मारीं, । हे उफराटी तुझ्या भस्माची थोरी, । ते मज सबाह्य विभूती लावीं त्रिपुरारी. ॥ २ ॥ मग मी भद्रायुचि होइन निजबोधें । शिवरंगीं नाचेन परिपूर्णानंदें । समाधिसुख तें भोगीं विण मानसरोधें । शिवरामप्रभुपदीं शिवयोगें नांदें. ॥ ३ ॥

## ललित.

भाळीं लाउनियां शिवरक्षा । करा अज्ञानाची रक्षा. ॥ १ ॥
तेणें निर्भय व्हाल देहीं । भय कळिकाळाचें नाहीं. ॥ ध्रु० ॥
ज्ञान प्रज्वळुनियां धूयीं । तनु उधळा रे सर्वही. ॥ २ ॥
पूर्ण शिवरामप्रभु शैव । दीक्षा दे सर्व ब्रह्मैव. ॥ ३ ॥

---

॥ श्रीसांबाय नमः ॥

पद.

जय जय, जी शशिमौळी, भवजाळीं गुंतलों बहुकाळीं । बोधत्रिशूळीं ये वेळीं तें तोडूनि प्रतिपाळीं. ॥ १ ॥ यावें शिवयोगी गुरुराया, टाकुनि माझ्या ठाया । माझें हृत्पद्म फुलउनियां । तेथें वसवीं पाया. ॥ ध्रु० ॥ भलत्या कुळिंचा हो तुजला भावें शरण आला, । तूं तंव तितुक्यानें तयाला वळसी चंद्रभाळा. ॥ २ ॥ यास्तव कुळ, गोत, अभिमान, निःशेष गाळुन केवळ सप्रेमें आपण आलों तुजला शरण. ॥ ३ ॥ आतां विलंबु न करावा, करीं आपुल्या यावा । पूर्ण आनंदा सुहावा शिवराम महादेवा. ॥ ४ ॥

ऐका शिवभक्ताचें महिमान, । शिवकथा परम पावन; । मागें वैश्या पिंगळा म्हणौन, । तिचें कथन अवधारा. ॥ १ ॥ ते शिवयोगिया पूजी महिमेनी । जाली सीमंतिनीचे गर्भाधानीं । रूप, औदार्य, गुणांची खाणी । कीर्तिमालिनी अभिधानें. ॥ २ ॥ राजपुत्र भद्रायुष । करावया विद्याभ्यास । त्या वैश्यगृहीं करितां विलास । दिवसेंदिवस वाढतु. ॥ ३ ॥ त्या वैश्याचा एक सुनयनाम । पुत्र होता अति उत्तम । दोघे बाळ मनोरम । सुखसंभ्रमें क्रीडतीं. ॥ ४ ॥ दोघांचें समान जेवणें, । दोघांचीं समान भूषणें, । दोघांचें एकवट मन, । एक समाधान दोघांचें. ॥ ५ ॥ त्या वैश्यें सम वय पाहून, । भले भले ऋषी मेळवून, । दोघां बाळांचें समान । व्रतबंधन पैं केलें. ॥ ६ ॥ व्रतबंधन बरवें जालिया, । दोघे अनुसरले गुरुराया; । सर्वहि विद्या अभ्यासिलिया । प्रेमविनयसुफळेंसीं. ॥ ७ ॥ त्यानंतरें वर्षें सोळा । भरलीं तया राजबाळा, । तों मागति त्याचिया घराला । अकाळें आला शिवयोगी. ॥ ८ ॥ सुमती आणि भद्रायुष । देखतां शिवयोगियास । दंडवत करूनि सावकाश । धरूनि उल्हास पूजिती. ॥ ९ ॥ जननी पुत्रीं पूजिला । शिवयोगी बहु आनंदला । राजपुत्रोद्देशें बोलिला । भरूनि राहिला कृपेनें. ॥ १० ॥

पद—( राग—धनाश्री ).

"कुशल कीं बापा तुजला, । क्षेम कीं माउलीला, । विद्या सर्वहि अभ्यासिल्या, ॥ १ ॥ बाळका रे ॥ ध्रु० ॥ तोषविलें कीं गुरुसी । तनुमन-

संपदेंसीं, । मज प्राणसख्या स्मरतोसी; ॥ २ ॥ पूर्ण गुरुराजसेवा । दावी शिवरामदेवा । देतें पर शिवाचा ठेवा." ॥ ३ ॥

## चामरी.

मुनि बोलतां यापरी । जननीनें प्रेमें करीं । पुत्र मुनिपायांवरी । नेउनियां घातला. ॥ बोले "राजस सुंदर । देवा हा तुझाकुमर, । प्राणदाता तूं निर्धार । हा करावा आपुला. ॥ स्वजनीं त्यागिलें येथें, । कोणी नाहीं हा अनाथ । ठेवीं याचे शिरीं हात, । तुजलागीं वोपिला. ॥ तुझा शिष्य निश्चयेंसि" म्हणूनि दे बाळकासी. । तो मुनी तया सुतासी । भक्तिमार्ग बोधिला. ॥ १ ॥

## पद.

"श्रुतिशास्त्रपुराणीं वर्णाश्रमविधी । तो धर्म त्वां आधीं सदा कीजे. ॥१॥
बाळ, हा सन्मार्ग सर्वदा आचरीं, । वेदाज्ञा तिळभरी झणीं लंघीं. ॥ २ ॥
हेळणा न करीं संतसज्जनासी, । केल्या त्या देवासी साहवेना. ॥ ३ ॥
गुरुदेव, विप्र, गायत्री, ब्राह्मण । यांचें करीं भजन शिवभावें. ॥ ४ ॥
चांडाळहि हो कां अतिथित्वें आला, । तो पाहिजे पूजिला स्वाधिकारें ।
शिवराम प्रभु वेदरूपें बोले । तैसा पूर्ण चाले तोचि धन्य. ॥ ६ ॥

प्राणासि संकट जरी तुजलागिं आला,
टाकूं नकोच निजसत्व कदाचि बाळा, ।
रक्षावया द्विजगुरू आणि धेनुवांतें,
बापा कदाचितहि बोल असत्य तेथें, ॥ १ ॥

परस्त्री, परद्रव्य जें देखसी कीं.
सवें सर्व तृष्णा मनींहूनि टाकीं, ।
श्रुती, सत्कथा, श्रद्धताचारधर्मीं
असों दे तुझी येथ तृष्णा सकामी. ॥ २ ॥

संध्या, जप, स्नान, उपासनेसीं
टाकूनि ना आचर आळसासी. ।
.......................................
....................................... ॥ ३ ॥

शठत्व, सक्रोध भया झुगारिं हा,
उद्वेग, पैशून्य त्यजीं दुराग्रहा. ।
कौटिल्य, उद्वेग सदा मनांतरीं
दंभेनसीं टाकुनि दे निरंतरीं. ॥ ४ ॥

क्षात्रधर्मी यद्यपि असती, । वृथा हिंसा झणीं करिसी, । शुष्क वैर, मृतशोकासी, । परनिंदेसी वर्जावें. ॥ ११ ॥ सुखवाडियासि साधीं मंत्रीं, । दया करीं दुःखितावरी, । पुण्यवंतीं संतोष धरीं, । दुष्टा करीं उदासीन. ॥ १२ ॥ अति क्रोध, अति आहार, । अति निद्रा, श्रम अपार, । अति क्रीडा अति वाग्विकार, । निरंतर वर्जावे. ॥१३॥ अति विद्या, अति श्रद्धा, भक्ती । अत्यंत पुण्य, अति स्मृती, । अति उत्साह, अति ख्याती, । अति धर्मे चित्तीं वाढवीं. ॥ १४ ॥ सकाम होईं निजपत्नी, । सक्रोध शत्रूंचिये निधनीं, । सलोभ होईं निःकाम पूर्णी । सासूय दुर्जनीं असावें. ॥ १५ ॥ सद्वेष होईं पाषांडासी, । सानुरागें सेवीं सज्जनासी, । हृदय नेदीं दुर्मंत्रियांसी, । होईं चाहाडासीं बहिराट. ॥१६॥ मंद, क्रूर, शठ, हट्टी, । चंचल आणि वटवटी, । पतित, नास्तिक, कपटी । दूरदृष्टीं वर्जावे. ॥१७॥ परि ज्ञानें हृदय जाण, । आपुली कीर्ति न बोलें आपण । कुटुंब, पुत्रवित्तीं पूर्ण । आसक्त झणीं होईं. ॥ १८ ॥ पतिव्रता निजपत्नी, । सासू सासरा आणि जननी, । संत, सद्गुरू यांच्या वचनीं । धरीं अनुदिनीं विश्वास. ॥ १९ ॥ सर्वस्वें रक्षीं आपणातें, । सावध ऐसें दृढ व्रत । निजभृत्यासहि कदाचित । विश्वासातें न करावें. ॥ २० ॥ चोरही सांपडला जरी, । विश्वासूनि झणें मारी, । निःकपटियासी शंका न धरीं, । न टळें तिळभरी सत्यासी. ॥२१॥ अनाथ, कृपण, विरोधी, । वृद्ध, स्त्री, पुत्र निरापराधी । हीं पाळावीं धनप्राणबुद्धी । शक्ती निरवधी निजबळें. ॥ २२ ॥ शत्रु वधार्ह जरी शरण आला. । झणीं मारसील तयाला, । भलता कोणी मागों आला । त्यासी दे आपुला मस्तकही. ॥ २३ ॥ रत्नापरी संपादीं कीर्ती, । कीर्तीच भूषण रायाप्रती । एक कीर्ति आहे ज्या संतती, । पुण्यसंपत्ती तेथें असे. ॥ २४ ॥ चंद्रा शोभविते जेंवि चंद्रिका, । तैसी कीर्ति भूषवी राजलोकां, । संपदा ही अनेका । अपकीर्तिनें देखा संहरे. ॥ २५ ॥ अपराध पुत्र ब्राह्मणांचा, । कोप मायबाप गुरूचा । व्यय होतां धनाचा, । इतुकें मनींच

तूं साहें. ॥ २६ ॥ जेणें संतुष्टता होय ब्राह्मणाला, । तैसेंच आचरिजे बाळा, । संकटीं बुडालिया भूपाळा, । ब्राह्मणकुळा उद्धरिजे. ॥ २७ ॥

## सवाई.

आयुष, यश, बळ, सौख्य, प्रजोन्नति, धन, जेणें सांचत तें करिं भावें;
देशहि, काळ, अकार्य, सुकार्यहि, शक्ति विचारुनि कार्य करावें. ।
बा, कवणासहि साधुन घे, परबाध सर्वेची निवारुनि जावें;
चोर, रिपू, अणि दुष्ट तयां करिं शासन शक्त्यनुकूल स्वभावें. ॥ १ ॥

स्नान, जपीं, पितृअग्निसुरार्चनिं, तांतडि तूं न करींच नृपाळा,
भोजन, निजहि सत्वर संपविं, निर्भय होय विपद्रिपुवेळा ।
सत्य, मनोहर, अल्पचि अक्षर, ............................
अर्थ बहूतचि येथें गुरुवर, शासन ब्रह्मकुळाला. ॥ २ ॥

ज्ञाति, सुतादिक, बंधु, कलत्रहि, मित्र ययांसि समान असावें,
पंडित सर्व समान गुरू, शिवकीर्तिकथे विन्मुखचि नसावें; ।
निर्मळ पुण्य नदीतट, शंकरदेउळसद्भुमिकेस बसावें.
कुलटा, गणिकाजन, कामुक, नीचसमागमठायिं कदा न राहावें. ॥ ३ ॥

## पद—( राग–गोडी ).

एक महादेव आश्रयिला त्वां जरि सर्वहि पूजीं देवांसी, । त्या त्या देवाचिये जयंतिचे दिनीं उत्सव करीं उल्हासीं. ॥ १ ॥ सदाचारदक्ष शांत, स्थिर, जिंतीं सहा वैरियांसी, । यापरि निर्मळ मन जेव्हां होइल शिवपद तें पावतोसी. ॥ ध्रु० ॥ वेदांताचे ज्ञानीं मननशीळ मुनि पुण्यतीर्थतरुवर, । वृषभधेनुरत्न, पतिव्रता देखोनि वंदीं निरंतर. ॥ २ ॥ उठोनि अरुणोदयीं सुस्नात निजदेहीं गुरुरूप शिव हृदयीं ध्यावा, । विष्णू लक्ष्मी विधी ब्रह्मा गणेशादि देवतास्तोम चिंतावा. ॥ ३ ॥ स्कंद, कात्यायनी, लक्ष्मी । देवी, वाणी अष्टश्रेणी दिक्पाळांची, । कश्यपादि ऋषी ध्याउनि मानसीं शिवपूजे बैसावें शुचि. ॥ ४ ॥ गंधादि उपचारीं व्यापक त्रिपुरारी पूर्ण तूं अंतरीं आराधीं, । शिवराम प्रभु भजल्या शंभू देतो स्वयंभुपदासी. ॥ ५ ॥

सुस्नात जें जें जपसी, । जें जें देसी, जें जें स्मरसी, । जें जें तपसी, ना तपसी, । तें तें शिवासी देत जाय. ॥ २८ ॥ निजतां, उठतां, बैसतां, ।

जेवितां, चालतां, घेतां, देतां, । पाहतां आणि बोलतां, । गौरीनाथा आठवीं. ॥ २९ ॥

**रुद्राक्षकंकणलसत्करदंडयुग्मं । भालांतरालधृतभस्मसितत्रिपुंड्रं ।**
**पंचाक्षरं परिपठन्परमंत्रराजं ध्यायन् सदा पशुपतेश्वरणे नमेथाः ॥ १ ॥**

रुद्राक्षमाळमय कंकण दोहिं हातीं,
भाळीं त्रिपुंड्र, अति शुभ्र धरी विभूती; ।
पंचाक्षरीं पठत नित्यहि साधुमेळें
चित्तांत ध्याय शिवमूर्ति अखंड खेळें. ॥ १ ॥

हा धर्मसंग्रह यापरी । बा, तुज कथिला, संग्रह करीं । याविण अन्यथा पुराणांतरीं । धर्म विस्तारीं प्रकाशिला. ॥ ३० ॥ आतां आणीक एक रहस्य, । सर्व आपदा करी नाश, । शिवतत्वाचा करी प्रकाश, । आहे निःशेष शिवकवच. ॥ ३१ ॥ तें कवच तुज सांगेन, । हृदयीं ठेवीं राखोन । विजयी होसी तेणेंकरून । शशिभूषणप्रसादें. ॥ ३२ ॥ पुढील अध्यायीं शिववर्म । कथा अत्यंत मनोरम, । प्रकाशी स्वयें पुरुषोत्तम । प्रभू शिवराम-दासाचा. ॥ ३३ ॥

**इति श्रीब्रह्मोत्तरखंडे शिवकथनं नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥**

## आरती.

जय देव, जय देव, जय धर्मसेतो, जय पार्वतीकांता । आरतें जवळी येसी तुझ्या पंथासी येतां. ॥ ध्रु० ॥ सर्वहि प्रकृतिधर्म आडमार्ग चुकूनि, । केवळ ज्ञानयोगें निवृत्तिसी लाउनि । संशयाचे आडदारे बहु दूर सांडउनि, । सत्पदालागीं नेसी सांब शिव शूळपाणी, । निष्कामकर्मयोगें सर्व चित्तमळ धुतां । मग शमा अनुसरोनि दश विसरूनि जातां, । सत्य गा वृत्तिदीपें भेदि देउनि भक्तां । निजवीसी आत्मशेजे हरा प्रमथगण-नाथा. ॥ २ ॥ सर्वहि शीण गेले तुझ्या लागतां पायीं, । सुख सुखा जाहलें गा निज लागतां देहीं, । देह विदेह न दिसे पूर्ण लाहिलों ठायीं, । शिवराम-बोध जाल्या, पुन्हा येणेंचि नाहीं. ॥ ३ ॥

### ललित.

प्रवृत्तिमार्गीच फिरवुनी, । निवृत्तिपेठे मज नेउनी, ॥ १ ॥ सोहळे भोगविशि वो । स्पर्शों नेदितां जीवभावो. ॥ ध्रु० ॥ उघडुनी अद्वैताचा ठेवा । चारित अनुभवाचा मेवा. ॥ २ ॥ पूर्ण शिवराम संतुष्ट, । तेणें झाला घष्टपुष्ट. ॥ ३ ॥

---

॥ श्रीसांबाय नमः ॥

पद—( राग—नट ).

मृडदर शंकरा सुखवासिया शिवा रे । मोहो महारिपु सेनेसिं येउनि ओढितो धांव एकसरें. ॥ ध्रु० ॥ वासनामय माण खिळिती ना जों मातें, । तों निजकवच लेववीं हें; । साधनसंपत्ति सहाय नसे मज भरंवसा तुझा आहे. ॥ १ ॥ बाणला निजबोध, अनुभवधनुष्यीं सज्जोनि दे निजबाण । त्याच बाणें सर्व रिपूही निर्दळूनि झुंझ करिन निर्वाण. ॥ २ ॥ तुझेनि सहायें विजय जैताचा पूर्ण गाजवीन नगारा, । शिवराम प्रभु निजपद लाहूनि लुटिन प्रेमभांडारा. ॥ ३ ॥

निरूपणाचें निजसार । शिवकवच अति सुंदर, । जें अंगीं लेउनि सुरासुर । मृत्युमार जिंकिती. ॥ १ ॥ तें शिवकवच सांगावया । वंदिलें म्यां विश्वव्यापिया । जें रक्षक सर्वप्राणियां । दावीं उघडुनियां शिवभक्तां. ॥ २ ॥ निर्मळ पाहोनि भूमिका बरी । बसावें स्वस्थ आसनावरी, । प्राणेंसीं करणें आणनि हारी, । अव्यय पुरारी चिंतावा. ॥ ३ ॥

हृत्पंकजांत जडला परम प्रकाशें
व्योमावकाश भरुनी शिव कोंदलासे; ।
देवो अतींद्रिय अनंत अनादि साना,
तो ध्याइजे अमन होउनि भूतराणा. ॥ १ ॥
ध्यानांबुनें सकळ धोउनि कर्ममेळा,
आत्मार्णवीं बुडवुनी निजवृत्तिबाळा, ।
न्यासूनियां शिवषडाक्षर दिव्यमंत्रीं,
रक्षा किजे शिवमयें कवचें शरीरीं. ॥ २ ॥

मी विस्मरोनि पडलों भवदुःखकूपीं
   रक्षू मला गिरिश सर्वसुरस्वरूपी ।
तें मंत्रमूळ निजनाम तया शिवाचें
   प्रक्षाळितु सकळ पातक मन्मळाचें. ॥ ३ ॥

सर्वत्र रक्षतु मला शिवअंतरात्मा
   ज्योतिर्मयस्वरुप, अद्वय, सौख्यधामा, ।
सूक्ष्माहुनी परमसूक्ष्म, अपारशक्ति,
   सर्वा भयांपासुनि पाळु समर्थमूर्ति. ॥ ४ ॥

होऊनि जो धरणि विश्व धरी स्वशक्तीं,
   रक्ष धरेश मज तो शिव अष्टमूर्ति. ।
जो आपरूप सकळ जीवन या जगातें,
   तो पाणियापासुनि शंकर पाळु मातें. ॥ ५ ॥

जाळूनि सर्व जग जो प्रलयावसानीं
   नाचे महासुखभरें स्वविलासठाणीं ।
तो काळरुद्र त्रिविधा वणव्यापासूनी
   काढूनि ठेवुं स्वरुपीं अपुल्या ठिकाणीं. ॥ ६ ॥

शोभे प्रदीप्त कनकापरि स्वप्रकाशीं,
   विद्यावराभय कुठार निजायुधासीं. ।
साजे चतुर्वदन तत्पुरुषी त्रिनेत्रू
   पूर्वेस रक्षु मज शंभु अजातशत्रू. ॥ ७ ॥

पाशांकुशश्रुतिकुठार त्रिशूळपाणी,
   ढक्काक्षमाळहि कपाळ महायुधानी ।
साजे चतुर्वदन, नीलरुचि त्रिनेत्रू
   रक्षू अघोर मज याम्य दिशे पवित्रू. ॥ ८ ॥

कुंदेंदुशंखअमल, स्फटिकप्रदीप्ती,
   वेदाक्षमाळ वर, निर्भय सर्वहंती ।
शंभू चतुर्मुख त्रिनेत्र महासमर्थू
   तो पश्चिमेस मज रक्षतु सद्यजातु. ॥ ९ ॥

वराक्षमाळात्रभय टंक हातीं.
सरोजकिंजल्कसमानदीप्ती, ।
त्रिलोचनू रक्षु चतुर्मुखांचा,
तो वामदेवो दिशे उत्तरेचा. ॥ १० ॥

वेदाभयांकुशवरा अणि पाशटंका,
ढक्काक्षशूळहि कपाळ करीं अनेका ।
कर्पूरगौर शिव पंचमुखप्रतापें
ऊर्ध्वें, च रक्षण करू मज आत्मरूपें. ॥ ११ ॥

तो चंद्रमौळी मम रक्षतु मस्तकासी,
श्रीभाळनेत्र करु रक्षण भाळदेशीं, ।
मन्नेत्रसन्मुख वसो भगनेत्रहारी,
नासांसि रक्षु जगदीश्वर निर्विकारी. ॥ १२ ॥

रक्षू मम श्रवण तो श्रुतिगीतकीर्ती,
पाळू कपाळ शिव तो स्वकपोलप्रीतीं ।
वक्रासि पंचमुख रक्षतु सावकाशीं,
तो वेदजिव्ह प्रतिपाळु यया जिभेसी. ॥ १३ ॥

तो नीळकंठ गळ रक्षतु सौख्यदानीं,
पाणिद्वयासि प्रतिपाळु पिनाकपाणी, ।
तो धर्मबाहु मम बाहुमुळासि रक्षु,
वक्षःस्थळाप्रति मखांतक तो निरीक्षू. ॥ १४ ॥

पोटासि रक्षु गिरिजावर लोकतारी
मज्जेसि रक्षु शिव तो मदनांतकारी, ।
सांभाळिजे सगुणनाभि गणेशतातें,
रक्षू महेश बरवा हर मत्कटातें. ॥ १५ ॥

कुबेरमित्र मज मांडियांसी,
जानुद्वयासि जगदीश रक्षी, ।
हे पोटऱ्या पुंगव केतुपाळू
सुरासुरां वंद्य पदें संभाळू. ॥ १६ ॥

महेशपाळू दिवसादियामीं,
तो वामदेवेश दुपारनेमीं, ।
रक्षी तृतीयप्रहरा त्र्यंबकू,
वृषभध्वज देव दिनांतरक्षकू. ॥ १७ ॥

निशेस आदी शशिमौळि रक्षिता,
गंगाधरू मध्य निशें विलोकिता, ।
गौरीपती पाळित अंतयामिनी,
मृत्युंजयो तारितु सर्वही दिनीं. ॥ १८ ॥

श्रीशंकरू रक्षतु अंतरस्थिता,
स्थाणू विलोकू मजला बहिःस्थिता, ।
अंतर्बहिर्माजि पशूपती भिडे,
शिवेंचि सांभाळ किजे चहूंकडे. ॥ १९ ॥

भुवननाथ वरू मज ठाकतां,
प्रमथवर्य जुडो मज चालतां, ।
बसलिया श्रुतिवेद्य करू दया,
शिव मला प्रतिपाळु निजेलिया. ॥ २० ॥

तो नीलरुद्र पथ चालतयासि तारी,
शैलारि दुर्ग चढत्यासि पुरत्रयारी, ।
औदार्यशक्ति, करुणाकर, चिद्विलासी,
संरक्षिं तूं मज अरण्यमहाप्रवासीं. ॥ २१ ॥

आस्फोटितप्रळयकल्प, पटुप्रकोपी,
स्फुट्टाट्टहासकुतुकेंचि भुगोल कोपी, ।
घोरारिसैन्यअनिवारमहाभयानें
भीतां मला कणविजे करुणानिधानें. ॥ २२ ॥

पत्त्यश्वमत्तगजघंटअनेकदाटी
दहासहस्र आणि विंशति लक्षकोटी, ।
अक्षौहिणीशतसहस्र रिपूजनातें
निर्दाळुनी सुखविजे मज दीननाथें. ॥ २३ ॥

शिवत्रिशूळ प्रळयांतकारी
अंतर्बहिश्चोरपीडा निवारी. ।
शार्दूळ रक्षु वृक सिंहहि त्यासरोखें
संहारिजे ईश धनुःपिनाकें. ॥ २४ ॥

दुःस्वप्न, दुःशकुन, दुर्गति, दौर्मनातें
दुर्भिक्ष दुर्व्यस नदुःसह दुर्यशातें, ।
उत्पाततापविषभीति असद्ग्रहांसीं
पीडाभय त्रिजगिंचें जगदीश नाशी. ॥ २५ ॥

पद—( चाल गद्याची सरळ ).

ॐ नमो भगवते सदाशिवाय । सकळ तत्त्वासि दूर जो, । सकळ लोकैककर्तार जो, । सकळ संहर्ता रजो । सकळलोकगुरुवर्य जो, । पारावाररहित, सर्वसाक्षिस्वरूप, चैतन्यघन, । सकळ कार्याकारणां साह्य, । दुरितार्ति प्रसह्य संहारकर्ता. ॥ १ ॥ सकळजगदभयंकर, सकळलोकैकशंकर, । जय शशांकशेखर, परात्पर, दीनबंधो ! ॥ २ ॥ जय शाश्वत पूर्ण, । जय जय निजवासनिर्गुण, । जय जय निराभास, निर्मन, आनंदघन, निरामय. ॥ ३ ॥ जय जय निःप्रपंचक, । निर्द्वंद्व, निष्कळंक, । जय निःसंगनिर्लेपिक । स्वसुखदायक सर्वात्मन् ! ॥ ४ ॥ जय निर्मळ, निर्मम, । जय निजविभवनिरुपम, । जय निराधार, पूर्णकाम, । सर्वोत्तम, शुद्धबुद्धा ! ॥ ५ ॥ जय नित्य सच्चिदानंदा, । जय परमशांत, झळके प्रकाशरूप । धगधग तेजोमय. ॥ ६ ॥ महारुद्र भद्रावतार, । महाभैरव, कल्पांतभैरव । कपाळमालाधर, खट्वांगखड्ग चर्मपाशांकुश किडिमिकि. ॥ ७ ॥ डमरु शोभति मृग शूळ चापबाण सणणणण । सणसणाट बाण, गदाशक्ति तडक, फुटत भिंडि तोमर मुसळ. ॥ ८ ॥ मुद्गल पाश, परिघ, भृशुंडि, शतघ्नी चक्रायुध, भीषणकरसहस्र मुखदंष्ट्रा कराळ, हहहह विकटाट्टहास्य कडडडड. ॥ ९ ॥ फोडित ब्रह्मांडमंडळ कां जो नागेंद्रकुंडल, जो नागेंद्रहार नागेंद्रचर्मांबरधर, जय मृत्युंजय त्र्यंबक त्रिपुरांत विरूपाक्ष विश्वेश्वर विश्वरूप दडदड दडकारि वृषभ तद्वाहन धडडडड जाळित आलें; । कराळ कालकूट प्राशुनी शोभला साजे विषभूषण विश्वतोमुख चहूंकडुन रक्ष भडडडड. ॥ १० ॥ ज्वलज्वल महामृत्युभयातें -मारि मारि रोगभ-

यातें वारिं वारिं, । विषसर्पभया संव्हारिं संव्हारिं चोरभयातें नासिं नासिं. । शत्रुतें ग्रासिं ग्रासिं, । त्रिशूळें विदारिं. ॥ ११ ॥ कुऱ्हाडिनें हाणिं हाणिं, । खड्गानें तडतडा तोडिं तोडिं, । खड्गानें फडफडा पाडिं पाडिं, । मुसळानें झडझडा झोडिं झोडिं, । सित चढवित सणणणण । स्वर्गीं कापिं कापिं राक्षसां कांपविं थरथरा मज अभय करिं करिं । मज भीता शांतविं । क्षुधातृषांहुनि दूर करिं करिं । दुःखातुर मज आनंदविं आनंदविं, । शिवकवचें झांकिं झांकिं, । त्र्यंबक तुज नमो नमो. ॥ १२ ॥

## पद---( राग--देशी ).

ऐसा कवचंरावो । कथिला तुज निःसंदेहो । वारी हा सर्व अपावो रे.॥१॥ निर्धारें बाळा. ॥ ध्रु० ॥ जो धरी हें कवच देहीं । त्याला भयवार्ता नाहीं, । तो चिरंजीव या देहीं. ॥ २ ॥ हे, कां मृत्यूनें गिळिला, । दारिद्र्यें आकळिला, । येणें त्या दुःखीं सुटला. ॥ ३ ॥ होय पातका शांती । देवीतें पूजिजेती । सायुज्य पावे देहांतीं । निर्धारें बाळा. ॥ ४ ॥ तूंही माझ्या उपदेशीं जरी कवच पूर्ण धरिसी । शिवराम श्रेय पावसी । निर्धारें." ॥५॥

ऐसें बोलोनि ऋषभ योगी । तया पार्थिवपुत्रालागीं । शंख खड्ग शत्रुभंगीं । दिधलें वेगें सप्रेमें. ॥ १७ ॥ मागुती भस्म मंत्रून, । अंग त्याचें कुरवाळुन, । सहा सहस्र गजांचें पूर्ण । बळ द्विगुणें दीधलें. ॥ १८ ॥ भस्मप्रभावें पावला थोरी, । बळऐश्वर्यें स्मृति अंतरीं, । तो राजपुत्र शोभला भारी । चंद्राचे परी शारदीये. ॥ १९ ॥ प्रांजुळि उभा नृपपुत्र । त्यासि पुन्हा म्हणे योगेश्वर । "हें खड्ग म्यां दिधलें तुज, थोर । तपोमंत्रप्रभावें. ॥ २० ॥ हें खड्ग अतितीक्ष्णधार, । ज्यासी सहज दाविसी दूर, । तो शत्रू मरे अतिसत्वर, । साक्षात थोर मृत्युहि. ॥ २१ ॥ या शंखाचें मोठें ध्वनित । जे शत्रू तुझे ऐकत, । तत्काळ होती मूर्च्छित, । हातिंचीं शस्त्रेंही गळती. ॥ २२ ॥ या दोहींच्या प्रभवें येथें । शिवकवचाचिया सामर्थ्यें । बारा सहस्र गजांचें बळ सत्य । जे शत्र, त्यांतें जिंकिसी. ॥ २३ ॥ भस्मधारणसामर्थ्यैंकरुनी । सर्व शत्रू जिंकिसी रणीं, । आपुलें स्वराज्य पावोनी । शासिसी धरणी स्वानंदें.॥२४॥ ऐसें भद्रायुष बोलिला । मातृपुत्रीं मग पूजिला, । आनंदवुनी सकळांला, । स्वसुखें गेला शिवयोगी. ॥ २५ ॥ ऐसें शिवकवचमाहिमान । सांगितलें

असाधारण । पुढील कथेचें निरोपण । सावधान अवधारा. ॥ २६ ॥ लक्ष्मीनारायणा शरण । ऐसा पूर्णानंदघन । शिवकथा चालवी निर्विघ्न । सुख संपूर्ण शिवरामीं. ॥ २७ ॥

**इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे शिवकवचनाम द्वादशोऽध्यायः॥ १२॥**

## आरती.

हे शिवयोगिया पाहे. ॥ ध्रु० ॥ कवच तुझें जे धरिती देहीं, । काळिकाळाचें भय त्यां नाहीं. ॥ १ ॥ शंखगजर तो पडल्या श्रवणीं । भेद महारिपु जाय पळोनी. ॥ २ ॥ दुरुनि पाहतां शम असिधारा, । कोणी तया न टिकेचि सामोरा. ॥ ३ ॥ घेती उधळण तव विभुतीचें, । जन्म जरादुःख मग त्या कैचें? ॥ ४ ॥ शिवराम प्रभु पूर्णानंदा । स्मरण तुझें निरसी गुणबंधा. ॥ ५ ॥

---

॥ श्री सांबायनमः ॥

## पद—( राग परज ).

देवा सच्चित्सुखधामा । तुझी अभिनव गुणमहिमा, । श्रुतिसी न सुचे सीमा, । काय कळतें आम्हां? ॥ ध्रु० ॥ तुझ्या भक्तांची गती । तेहीं न कळे पशुपती, । जे कां अवचट पूजितात । वांचुनि अतिशय विरक्ती, । ते मग कांहिं न पाहती, । भक्ता सर्वस्वें वळती । धनकनकभूषण वर्पुन त्रिभुवनपावन पद देती. ॥ १ ॥ ऐसें भक्ताचें देणें, । ऐकूनि शिवकीर्ति श्रवणें, । टाकुनि म्यां अंतःकरणें । सर्वहि विषयांसीं करणें । तुझ्या पायीं सहल करणें, । दृढतर घेतलें धरणें, । जननमरणभय मणिगणें उबगुनि मागें तव करणें. ॥ २ ॥ कैलासाचलवासी । पूर्ण लुटिन अनायासीं, । त्याविण नलगे अम्हांसी तुझ्या क्षणिका धनराशी । शिवरामा जितकामासी । ठेवीं मज पायांपासीं. ॥ ३ ॥

शिवभक्ताचा समागम । पूर्ण करी सर्वकाम, । म्हणोनि भद्रायुची परम । कथा मनोरथ सांगेन. ॥ १ ॥ राजा दशार्णव देशाचा । वज्रबाहु, बाप भद्रायूचा; । त्याला भूपती मागधाचा । शत्रू साचा तो झाला. ॥ २ ॥

त्या हेमरथें सक्रोषें । रथोत्कटें दुर्धर्षें । सैन्येंसीं येऊनि सायासें । दशार्णवदेश वेढिला. ॥ ३ ॥ देशीं भरले सेनानी, । घरोघरीं प्रवेशुनी । रत्नें भूषणें घेती चोरुनी, । घरेंचि कोणी जाळिती. ॥ ४ ॥ कोणी द्रव्यभार हरिती । कोणी स्त्रिया अपहारिती । कोणी गोधनें वळिती । कोणी लुटिती धनधान्य. ॥ ५ ॥ यापरी वज्रबाहूचें नगर, । मागधीं संहारिलें अपार । देखोनि सज्जती दळभार, । युद्धा नृपवर लोटला. ॥ ६ ॥ वज्रबाहूचे सेनापती । मागधेंसीं धडाड भीडती । वज्रबाहू महारथी । मागधीं रथीं देखिला. ॥ ७ ॥ शरधारीं वर्षले बाण । मागधीं केलें मोठें कंदन; । वज्रबाहूही क्रोधेंकरून । शरवर्षण तो करी. ॥८॥ वज्रबाहूचें दळ आगळें । सर्वही सैनिक त्यावरी पडले । मागधांनीं महाबळें । युद्ध केलें तुंबळ. ॥ ९ ॥ वज्रबाहूचें मोडलें सैन्य । एकावरी पडले बहुजन, । मागधीं मारिलें त्याचें रण । लाधले पूर्ण जयलक्ष्मी. ॥१०॥ कोणीं मोडिला त्याचा रथ, । धनुर्बाण कोणी हरित, । कोणी सारथी मारित । कोणी मोडित खर्गातें. ॥ ११ ॥ छिन्नधन्वा रथसारथी । मागधीं मग बांधिला रथपती । जिंकोनि सैन्यसंपत्ती । मग चालविली नगरातें. ॥ १२ ॥ प्रधानासि जिंकोनि सैन्य । नगरीं भरलें संपूर्ण, । राजस्त्रिया दासदासीजन । बंदीं धरोनि चालवी. ॥ १३ ॥ लुटूनि रायाचें भांडार । यापरी नाशूनि गेले नगर, । रथीं बांधोनि नृपवर । मागध समग्र चालिले. ॥ १४ ॥ राष्ट्र यापरी नाशिलें, । स्त्रियांसि रायासि धरूनि नेलें, । वज्रबाहूसि बंदीं ठेविलें, । हें श्रुत झालें भद्रायूसी. ॥ १५ ॥ वृत्तांत ऐकिला यापरी, । भद्रायू कोपला सिंहापरी, । सुनयासवें तेचि अवसरीं । अश्वावरी आरूढले. ॥ १६ ॥ सांवरूनि शंख खड्ग । दोघे चालिले सवेग, । देशीं भरतां रागें रागें, । स्वजन अनेक देखिले. ॥१७॥ कोणी पळती, ताडिले दिसती, । गोधनें हंबरडा हाणिती, । धनेंविण आक्रोशती, । देखतां भूपती क्षोभला. ॥ १८ ॥ भद्रायू रिघे शत्रुरणीं, । धनुष्यीं सितवेगें चढवुनी, । वर्षत लोटला बाणश्रेणी, । कितेक विंधोनि पाडिले. ॥१९॥ फिरलें मागधाचें कटक, । बाण वर्षती तिखट, । सिंहनादें देती हाक, । बाळक झांकिला. ॥ २० ॥ भद्रायू वर्षला शरधारीं, । शिवकवच त्याला आंतबाहेरी, । तेणें न ढळत तिळभरी । रणामाझारीं लोटला. ॥ २१ ॥ गजाचे दृष्टीं नाहीं मशक, । तैसा रणीं

रिचे बाळक, । गजाश्व रथेंसि सैनिक । बाणीं कितेक पाडिले. ॥ २२ ॥ तेथें एक मारिला महारथी, । सुतेंसहित पाडिला क्षितीं, । आपण बैसला त्याचे रथीं, । सुनयन सारथी सहाय. ॥ २३ ॥

सैन्यांत सिंहवत लोटत बाळ अंगें,
देखोनि ते परतले रिपुही सवेगें, ।
सज्जूनियां धनुष सायक वर्षताती;
त्यासन्मुखें भिडत उन्नतखड्गहस्ती. ॥ १ ॥

कल्पांतकाळभीषणसमखड्ग हातीं,
सव्यापसव्य फिरवीत भिडे रणांतीं; ।
त्याच्या प्रभेनिच कितेक मरोनि गेले,
कित्येक टाकुनि रणांगणही पळाले. ॥ २ ॥

वेगें चिरायुष धरी गुरु शंख वक्त्रीं,
नादें समग्र गगनेंसि भरे धरित्री; ।
तें ऐकतांचि गज अश्व महारथींचे
निःशस्त्र मूर्च्छित उलंडति वीर साचे. ॥ ३ ॥

मृतप्राय देखोनि त्या वैरियांतें,
न मारीच भद्रायु शास्त्रानुमत्तें. ।
स्त्रियांसी, रणीं सोडवुनी पित्यातें,
स्वयें सोडवी, बंद सर्वा जनांतें. ॥ ४ ॥

तें शत्रुसैन्य मग आवरुनी विलासें,
त्याच्या स्त्रियां हयगजां हरिलें सरोषें; ।
दासी, रथ, ध्वजसहस्त्र धनासि लूटी,
राजा प्रधानसह बांधुनि जेठजेठी. ॥ ५ ॥

बांधोनि मागधपती सह मंत्रियांतें
राजा प्रवेशत पुरींत सवेग तेथें; ।
पूर्वील जे नगर लोक भयें पळाले,
भद्रायुचें अभय घेउनि सर्व आले. ॥ ६ ॥

पद—( धाटी–यारो संभालो रे ).

" अभिनव चर्या हे याची दिसते आम्हां. ॥ ध्रु० ॥ बाळक कवण कीं अघटित याची करणी न कळे आम्हांला. ॥ १ ॥ मेली ते जिवविली येणें, । होईल धनी अमरांचा. ॥ २ ॥ मनुज नव्हे हा, कोणी एक सिद्ध । सुधाकर नयनांचा. ॥ ३ ॥ याची जननी, बाप सदा शिवराममनींचा हो, । पूर्णानंदें जिंकुनि गेला सिंधुरिपू सैन्याचा." ॥ ४ ॥

भद्रायु तो निजपित्याप्रति तेथ आला,
सद्भावपूर्वक तया प्रणिपात केला; ।
रायें उठोनि हृदयीं धरिलें तयातें,
पुसे गद्गदें त्या बहू थोर आर्तें. ॥ ७ ॥

पद—( राग–पावक धाटी सावध सुमना रे ).

"कोण बा आहेसि तूं, सांग मातें, । तुझेनि बहुतांचि निवालीं चित्तें । सुखावों येथें. ॥ ध्रु० ॥ गंधर्व, यक्ष, देव, किन्नर, ताता । कवण तुझा बाप ? कोण तुझी माता ? । वैऱ्यांनीं पीडियलें आम्हां अनाथां, । कृपेनें वांचविलें येऊनि आतां, । स्वसुखदाता. ॥ १ ॥ इतुलें शौर्य तुज दिधलें कोणें ? । जिंकिसी नेणों जग एक्याचि बाणें । ऋणिया मज केलें तुझिया गुणानें, । नोहवे उतराई तुज माझ्यानें । ब्रह्मायुषानें. ॥ २ ॥ स्त्री पुत्र, बंधुवर्ग, राज्यसंपदा, । टाकुनी सर्व तुज सेवीन सदा; । तुजसीं मन रते स्वसुखकंदा, । शिवरामाचा धनी तूंचि प्रबुद्धा पूर्णानंदा.॥३॥

बा माझ्या प्राणरक्षका, । तुझा वृत्तांत सांग सखया." । ऐकूनि वृत्तांत थोडका, । भद्रायू जनका बोलतु. ॥२४॥ "हा वैश्यपुत्र परियेसीं, । सुनयन मत्सखा तेजोराशी; । याच्या घरीं मी मातेसीं । बहुत दिवस नांदतु. ॥ २५ ॥ मी प्रसिद्ध भद्रायू नांवें, । उरलें मग सांगेन आघवें, । आपण आतां नगरा जावें । सैन्यवैभवेंसमवेत. ॥ २६ ॥ शत्रुभय टाकूनि मानसीं, । आपण वर्तावें सुखेंसीं, । मी पुन्हां येईन तुम्हांपाशीं । तों या रायासी न सोडावें. ॥२७॥ मी आतां जाईन माझ्या घरा," । ऐसें सांगोनि नृपवरा, । सवें घेउनि निजमित्रा । निजमंदिरा पावला. ॥२८॥ वृत्तांत सांगितला मायेसी, । ते बहुत आल्हादली मानसीं, । बाळ आलिंगिला पोटेंसीं, । नेत्रीं बाष्पांसी गाळित.॥२९॥

### सवाई.

वैश्यपती हृदयीं नृपपुत्र धरूनि सुखें मग भेटुनि पूजी,
वज्रबाहु तिकडे निजराज्य निरंकुश लाहुनि क्रीडत गाजी; ।
चंद्रांगदसदनासि दुजे दिनिं तो शिवयोगि तया घडिमाजी,
भद्रायुषगुणकर्म वदोनि तयां उभयांसिहि सोयरिक योजी. ॥ १ ॥

“ चंद्रांगदा, तो नवरा बळाग्रणी,
दे त्यासि तूझी निजकीर्तिमालिनी.” ।
बोलोनि ऐसें निषधाधिपाप्रती
सुखेंचि गेला शिवयोगिया यती. ॥ ८ ॥

### चामरी.

चंद्रांगदें एके दिनीं मंगळ दिन पाहोनि भद्रायुसी बोलावुनी दिली कीर्तिमालिनी. । नवरानवरी बोहल्यावरी हेमसिंहासनीं भारी शोभति, जेविं चंद्र रात्रीं समवेतरोहिणी; । वज्रबाहु राजयांसवेंचि बोलावुनियां, । त्या सामोरा जाउनियां समानयुक्त पुजोनियां गृहासि राव आणिला; । नमी भद्रायु पाउलां; । विलोकोनि तया मुला तटस्थ भूपती मनीं. ॥ १ ॥

### पद.

आलिंगुनि भद्रायुसि पहाहो । नृपा पुसे रावो. ॥ १ ॥ “हा कोण विलासी ? । हें सांग मजपासीं. ॥ ध्रु० ॥ येणें मद्रिपु सर्वहि जिंणिले, मला सुखी केलें. ॥ २ ॥ प्राणदाता केवळ माझा । जामाता जो तुझा. ॥ ३ ॥ कोणाचा सुत कोणे कुळिंचा ? । वृत्तांत वद याचा. ॥ ४ ॥ शिवरामप्रभु पूर्ण सुखेंसीं । तूं बोल आम्हांसी.” ॥ ५ ॥

ऐशी ऐकोनि त्याची मात । एकांतीं नेला नृपनाथ, । भद्रायूचा वृत्तांत । बोले तेथें चंद्रांगद. ॥ ३० ॥ हा तुझा पुत्र नृपाळा, । बाळचि जो रोगें पीडिला । मायेशीं वनीं टाकिला, । व्रणरोगाला उबगोनी. ॥ ३१ ॥ ते व्रणांग तुझी अंगना । कोणीं एका वैश्यें देखिली जाणा, । तेणें दोघां नेऊनि भुवना । केलें रक्षणा मातृत्वें. ॥ ३२ ॥ तंव हा रोगें बहुत पिडिला । दैवास्तव मृत्यु पावला । कोणी एक योगी तेथें पातला । तेणें जिवविला मागुती. ॥ ३३ ॥ त्याच्याच प्रतापें सम्यक । दोघें दिव्यरूप

झालीं देख, । मग तयांच्या पुजे तुष्टोनि अधिक । दे खड्ग, शंख तो योगी. ॥ ३४ ॥ देऊनि खड्गशंखांसी । शिवकवचें आच्छादिलें यासी । तेणें द्विषट्सहस्रगजबळासी । निजांगेंसी धरी तो. ॥ ३५ ॥ हा पारंग सर्व विषयीं । म्हणौनि म्यां केला मम जावई; । आतां यास याचे मायेसही । घेऊनि जाईं निजगृहा. ॥ ३६ ॥ ऐसें चंद्रांगदें ते काळीं । बोलोनि सुमती पाचारिली; । अंतर्गृहींचि ते मग आली, । दुरी राहिली सलज्ज. ॥ ३७ ॥ सर्वाभरणीं भूषिली बाळा, । देखतां वज्रबाहू लवला; । पूर्वील अपकार जो आपला । स्मरोनि लाजला मानसीं. ॥ ३८ ॥ दोघांच्या दर्शनकौतुकें । राजा आनंदला अधिकें, । पुलकांकित होऊनि हरिखें । दोघें सुखें आलिंगी. ॥ ३९ ॥

## पद—( राग—देशी ).

यापरि नैषधभूपाळें । राया सन्मानिलें, । मंत्र्यांसह सुखमेळें । सर्वांसि भंजविलें. ॥ १ ॥ वज्रबाहूचें सुकृत । फळासि आलें बहुत, । सुरवर सर्वही स्तवित । धन्य तयातें म्हणत. ॥ ध्रु० ॥ घेऊनि आपुली योषा । सून सुतासह सहसा । स्वसुखें आला देशा, । सुख झालें प्रवासा. ॥२॥ भद्रायु पावणनामा । पूर्ण पावूनि कामा । ऐसा संतांचा महिमा, । आराधीत शिवरामा. ॥ ३ ॥

मग यथाकाळें जाण । वज्रबाहूसि स्वर्गारोहण । जाहलिया भद्रायु आपण । राज्यपालण करीतसे. ॥ ४० ॥ मागध देशाचा नाथ । सोडोनि दिला हेमरथ, । ब्रह्मऋषींसि अभिमत । मंत्र्यांसि वर्तत प्रतिपाळी. ॥ ४१ ॥ जन्मांतरीं शिवपूजन । करूनि भद्रायु आपण । निःकंटक राज्य पावोन । स्त्रियेसीं अनुदिनीं क्रीडत. ॥ ४२ ॥ हे कथा परम पावनी । निःशंक चालिली स्कंदपुराणीं, । वक्ता सद्गुरुनाथ धणी । श्रोत्यांलागूनि प्रगटित. ॥ ४३ ॥ पूर्णानंद दयानिधी । शिवकथा सांगे निरवधी । शिवरामीं करी प्रसिद्धी । संतांमधें कथामिषें. ॥४४॥ लक्ष्मीनारायण समर्थ । दावी शिवभक्त पूजा समर्थ, । उपजविला शिवभक्त । उद्धारार्थ शिवभक्ती. ॥ ४५ ॥ हे कथा मनोरम । ऐकतां होइजे पूर्णकाम । वक्ता वदविता देशिकोत्तम । शिवराम नाम धरूनियां. ॥ ४६ ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

## आरति.

जय देव जय देव । हर हर हर हर हर हर हर महादेवा ! । घडि घडि घडि घडि दे तुझी सेवा. ॥ ध्रु० ॥ सद्गुरुरूपें सेवा अवचट जरि घेसी । तितुकेन मग त्याचा ऋणिया तूं होसी; । दुरी निवारुनि त्याच्या सकळहि कर्मासी, । मागितल्याहुनि पूर्वी सर्वस्वहि देसी. ॥ १ ॥ पहा पहा भद्रायूनें मागितलें काये ? । एक्या दिनें पूजेसि भुललासी मोहें; । खड्ग, शंख देउनि शत्रूसमुदायें । वधवुनी त्याला देशी अपुला निजठायें. ॥ २ ॥ कांहीं न मागणें तें तव वरदान, । कांहीं न बोलणें तें तूझें स्तवन, । कांहीं न देखणें तें अवलोकन पूर्ण, । हेंही शिवरामा तुज साहेना जाण. ॥ ३ ॥

## ललित.

करितां संतांचा शेजार । तेणें तुटे येरझार. ॥ ध्रु० ॥
न कळे संतांची महंती । ज्यांचे घरीं राबे शांती. ॥ १ ॥
अंगीं कुरवाळुनियां कर । मृत्यु मारूनि करिती अमर. ॥ २ ॥
पूर्ण शिवराम ज्यांपाशीं । अखंड खेळे दिवसानिशीं. ३ ॥

इति त्रयोदशोऽध्याये आरति ललित समाप्त.

---

॥ श्रीसांबसदाशिवाय नमः ॥

## पद संस्कृत.

भवभ्रांतिसंहर्तारं । मायालोकत्रयकर्तारं । वीतषड्गुणविकारं ॥ १ ॥ शंकरं वंदे ॥ ध्रु० ॥ नित्यानंदैकलिंगं । कर्पूरातिसोज्ज्वलांगं । वीक्षासंशिक्षितानंगं ॥ २ ॥ सर्वव्यापकं संतं । भावालयनिवसंतं । प्रेमपल्लवितवसंतं ॥ ३ ॥ नैगमगिरां दूरं । प्रणयपेशलांदूरं । करुणावारां निधिपूरं । पूर्णानंदाभिरामं । गिरिकन्यकाभिरामं । परिपूरितशिवरामम् ॥ ४ ॥

प्राप्त झालें नृपासन । भद्रायु राजा आपण । कदाचित् स्त्रीसहवर्तमान । रम्य वन प्रवेशला. ॥ १ ॥ तेथ विकासित लवलव । पुष्पें फळें नवपल्लव ।

मल्लिका फुललिया अभिनव । गुंजारव करिताती. ॥ २ ॥ नवकेसरांची सुगंधी । अनुरागियातें आनंदी । अशोकतरूचिये मांदीं । तमाल संवीं शोभत. ॥ ३ ॥ फळें दाटलीं उमोप । लवलव माधवीनवमंडप, । प्रवाळकुसुमीं पडतां आतप । शोभेसि माप न करवे. ॥ ४ ॥ च्यूतसमेत पुन्नागें । कोकिळास्वरीं अनुरागें । वसंतसमयीं तेथ निर्व्यंग । स्त्रियेसीं सांग विहरतु, ॥ ५ ॥ तों शिव करी विंदान । पहावया भद्रायूचें मन, । स्वयेंचि होऊन ब्राह्मण । दंपतीपणें विहरतु. ॥ ६ ॥ तों तेथ जवळी प्राप्ती । धांवत येत द्विजदंपती, । पाठीं व्याघ्र झोंबिजती । तिहीं नृपती देखिला. ॥ ७ ॥ "राख राख नृपवरा, । काय पाहसी कृपासागरा? । व्याघ्र गिळों पाहे अतित्वरा, । शब्दीं जिव्हारा भेदित. ॥ ८ ॥ हा केवळ पर्वताकार । सर्व प्राणियां भयंकर । जों आमुचा न करी संहार । तों सत्वर रक्षावें." ॥ ९ ॥

आक्रंदतां त्या द्विजसुंदरेसी,
सज्जी धनू राव सवें शरेंसीं; ।
तों धावुनी दुर्धर दुष्ट वाघें,
द्विजांगना आकळिली सवेगें. ॥ १ ॥

आकर्ण ओढी धनु तेचि संधीं,
कठोर बाणीं मग त्यासि विंधी; ।
तों त्या शरांनीं न टळेचि कांहीं,
जैसे गिरीं अंबुद वर्षतांही. ॥ २ ॥

तो मार खातचि पहा गिळि त्या स्त्रियेसी,
हा, हा, करी विप्र बहू दुखेंसीं. ।
पतिव्रते गेलिस सांग कोठें,
रडूं रडूं दुःख करीत मोठें. ॥ ३ ॥

टाकूनि राणी मज एकल्यासी,
तूं चालिलीसी कवण्या स्थळासी; ।
प्राणप्रिया तूं पढियेसि मातें,
तूतेंविना केविं तरूं श्रमातें? ॥ ४ ॥

पद. (राग शंकराभरण.)

द्विज म्हणे “राया बारा सहस्त्र हत्तींचें फार तुझ्या अंगीं बळ होतें मोठें। तुझीं शस्त्रें अस्त्रें आतां गेलीं कोठें ? । शंख खड्ग आयुधें मिरविसी नेटें । सर्व सामर्थ्य तुझेंच विफळ होउनि आटे, ॥ १ ॥ धिग् जिणें रे राजया, । तूं वांचलासी या धरे कासया ? ॥ ध्रु० ॥ इतुकें राणिचें प्राणी वांचवेना जरी तुज, कासया वागविसी पराक्रम ? । आर्ता सर्वस्वें रक्षणें राजधर्म । तुझ्या वर्णाचें तुज नाहीं निजवर्म, । विक्रमेंविण राया जिणें मरणासम. ॥ २॥ दानहीन धनिक, जित मेल्याचि परी, । आर्ता रक्षावें निजभावें किंवा अग्नींत मरावें । पूर्ण शिवरामभक्तिविमुखें कासया जिवावें ? ” ॥ ३ ॥

ऐकोनि ऐसी ग्लांतिवाणी । आपुल्या तिरस्कारेंसि ऐकोनी, । राजा शोकाकुलित होउनी । आपुले मनीं चिंतिलें. ॥ १० ॥ अहो, माझेनि दैव-बळें । माझें सामर्थ्य आजि लोपलें, । कीर्तीसिही म्यां जळ दिधलें । पाप फळलें मज माझें. ॥ ११ ॥ काळें चित्तधर्मोदय । मज दुर्भाग्याचा पात्र विलय, । गेल्या संपदा होउनी क्षय । झाला लय आयुष्याचा. ॥ १२ ॥ आयुष्य आणि संपत्ती । दैवेंकरूनि उगवती । ........................ । नाशही पावती क्षणांत. ॥ १३ ॥ आतांच तो ब्राह्मण । स्त्रियेचें शोकीं निमग्न । शोक तो याचा निवारीन । प्राणही वेंचुनि आपुले. ॥ १४ ॥ यापरी ब्राह्मणाच्या काजा । चिंतुनी मग भद्रायु राजा । वंदूनि विप्राच्या पदांबुजा । विनवी वोजा शांतवी. ॥ १५ ॥

सवाई.

‘ जय भूसुरराज दयानिधि देव कृपा करिं मजलागुनि वेगें,
मी हतभाग्य गतप्रभ देइन सर्वहि संपति त्याच विभागें;
हें निजराज्य चतुर्विध सैन्य समर्पिन होईं प्रसन्न निजांगें,
पुत्र कलत्र तनूसह घेइं अतां तुज काय अपेक्षित सांगें ? ” ॥ १ ॥

भूदेव बोले मग “ऐक राजया,
अंधासि आदर्श अपूर्व कासया ? ।
भैक्ष्यें जिये काय करील तो वर ?
मूर्खा करीं पुस्तक कायसें बरें ? ॥ ५ ॥

निस्त्रीक सांचुनि धनासि करील काई,
याल।गिं सांप्रतचि मी गतभार्य देही. ।
भार्यागसंगधणिही मजलागिं नाहीं,
तूझ्या स्त्रियेसि मज यास्तव शीघ्र देयीं. " ॥ ६ ॥

पद.

"कोणीकडे शासन । कवण हा धर्म देवा । परदारा तूं इच्छिसि रे.॥ १ ॥ हें काय बरें ? ॥ ध्रु० ॥ देहादिसर्वस्वें दातार देखिले । स्त्रीदान द्यावें विप्रासि रे ॥ २ ॥ हें कोठें आहे रे ? ॥ ध्रु० ॥ परदार विषव्रत ते लोक, दुर्लभ शिवरामप्रभु पूर्ण त्यासी रे ॥ ३ ॥ हें सिद्ध आहे." ॥ ध्रु० ॥

ऐकोनि म्हणे ब्राह्मण । "राया ब्रह्महत्या सहस्त्रही जाण, । आणीकही जें कां पाप दारुण । तें लावी न या दोषा. ॥ १६ ॥ जेथें हत्या दृष्टीस नाहीं, । तेथें परदारापाप तें काई ? । यालागीं तुझी भार्या देईं, । संदेह कांहीं न धरावा. ॥ १७ ॥ यालागीं तुवां भार्यातांसी । निरीक्षितां नरका जासी;" । राय ऐकोनियां वचनासी, । ऐसें मानसीं योजिलें. ॥ १८ ॥ अरक्षणाच्या पापाहुनी । पत्नीदान श्रेष्ठ जनीं; । यालागीं पत्नीस देउनी । मग मी अग्नी प्रवेशेन. ॥ १९ ॥ येणें होईन पापमुक्त । कीर्तीही राहील संतत; । ऐसें बोलोनि नृपनाथ । अग्नी तेथें सिद्ध करी. ॥ २० ॥ बोलावूनि त्याच ब्राह्मणा । शिवार्पण केली अंगना, । वंदुनि सर्व देवतागणां । केल्या प्रदाक्षिणा अग्नीसी. ॥ २१ ॥ हृदयीं ध्यायिला त्रिपुरारी, । पडावा जों अग्निमाझारीं । तों शिव प्रगटोनि ते अवसरीं । हाहाकारीं वारी रायातें. ॥ २२ ॥

सवाई.

देव दयानिधि पंचमुखप्रिय पार्वतिनाथ, निशापति मौळीं,
हातिं पिनाक, त्रिलोचन, पिंगट दाट जटाजुटिं गांग झळाळी,
भास्करकोटिमनोहर तेज, गजांबर, भूषयली तनु व्याळीं,
पूर्वसुखास्पद चिन्मय तो शिव सर्वभुतीं शिवराम न्यहाळी. ॥ २ ॥

खट्वांगशूळ असिचर्म कुठारयष्टी,
निर्भीतपद्म मृग आणि पिनाक मुष्टीं ।

तो नीळकंठ वृषभावरि देखतां हो,
दाटे नपासि मग सात्विक अष्टभावो. ॥ ७ ॥

तों पुष्पें सुर वर्षिती नभिंहुनी ते वाहती दुंदुभी,
इंद्रादी सनकादि नारद ऋषी गाती शिवा वालभीं ।
मध्यें सांब महेश शोभत कृपा केली चिरायूवरी,
ऐसा शंभु विलोकुनी स्तवितसे राजा मृदू उत्तरीं. ॥ ८ ॥

पद.

"देवदयानिधी सर्वसुखात्मक पावन चिन्मयमूर्ती ।
नामरूपासी न कळे सीमा, हा भवदावनिवारककीर्ती. ॥ १ ॥

देवाधिदेवा, तुझ्या पायींच ठाव द्यावा. ॥ ध्रु० ॥

मुनिजनमानसमंदिरभूषण, जनक जगाचा होसी. ।
गुणमय आवरणा निवारुनि जनीं वनीं भेटि देसी. ॥ २ ॥

सर्व जगाचा देखणा असती हृदयगुहेसीं निजांगें, ।
म्हणउनि योगी गिवसिति तुजला बहुविध साधनयोगें. ॥ ३ ॥

एकचि म्हणउनि जाणति जे तुज एकरूप त्यां दिससी ।
बहुविधमतिया बहुघटजलगत मी हरा परी तूं गमसी. ॥ ४ ॥

भजमाजि मी होउनि माझ्या स्तवनाचें सुख देसी, ।
भजनसुखें पूर्ण महत्पद निज शिवरामा देशी. ॥ ५ ॥

गवेषणा तूं मतिवाग्विकल्पा,
स्वयंप्रकाशा परमात्मरूपा, ।
माझी गिरा हे प्रकृती गुणांची,
करील कैशी स्तुति निर्गुणाची. ॥ ९ ॥

तथापि भक्तिगृह आश्रयोनियां,
भजन तूतें शिवदेवराजया ! ।
अपार संसारसुदुस्तरार्णवा,
तरेन तेणें गिरिशा दयार्णवा. ॥ १० ॥

नमो नमः तुज देवा । नमः शंभो महादेवा, । नमः त्रिमूर्तीच्या लाघवा, । आद्यंत सर्वां तूं करिसी, ॥ २३ ॥ नमो आदि विश्वाचिया, । नमः साक्षी विश्वप्रत्यया, । सन्मात्रबोधा अप्रमेया, । अनंतमया निजतत्वा. ॥ २४ ॥ निराभास नित्यधामा, । सत्यज्ञान तूं अंतरात्मा; । शुद्ध बुद्ध हृत्संगमा, । सर्व कर्मा अलिप्ता. ॥ २५ ॥ नमो वेदांतवेद्यमूर्ती, । नमो वेदमूळ आंतवर्ती, । नमो निवृत्ति गुणवृत्ती, । प्रगटव्यक्ती खेळणा. ॥ २६ ॥ नमो नमः कल्याणवीर्या, । नमः कल्याणफळदातया, । नमः आनंदमहात्मया, । विश्वरूपिया अतिशांता. ॥ २७ ॥ सूक्ष्मा अत्यंत घोरा, । घोर आद्याच्या वैश्वनरा, । भवबीजाच्या भर्जनकरा, । सुरासुरां वरिष्ठा. ॥ २८ ॥ नमो विध्वस्तमायागुणा, । सच्चिदानंदा गुणनिधाना, । शरण आलों तुझिय चरणां । जगज्जीवना मज पाहीं. ॥ २९ ॥

शंभो शशांककिरिटा शिवजी पवित्रा,
गौरीपती, अनळचंद्रदिनेश नेत्रा, ।
गंगाधरा, स्मरनिवारण पुण्यकीर्ते,
भूतेश पर्वतनिवास शिवा नमस्ते. ॥ ११ ॥"

यापरी ऐकतां सांब । तुष्टला भगवंत महादेव । पार्वतीश अभिनव । वरवैभव बोलतु. ॥ ३० ॥

पद—( राग भैरवी ).

"राया धन्य धन्य तुझी बुद्धी । तुझ्या स्तुतीं तुष्टलों मीं आधीं ।
अन्य भाव टाकुनी स्वानंदीं । मज पूजीं चर्मवृत्तीमध्यें. ॥ १ ॥

तुझ्या भावपरीक्षेलागुन । आलों येथें होऊनि ब्राह्मण, ।
व्याघ्रें जिसी खादलें मारून, । तेही माझी पार्वती तूं जाण. ॥ ध्रु० ॥

तुझ्या शरीं न ढळे विंधिला, । तो व्याघ्र म्यां मायेनें कल्पिला, ।
तुझें धैर्य पहावया भूपाळा, । मागितलें तुझिये महिला. ॥ २ ॥

तुझ्या कीर्तिमालिनीसद्भावें, । मी तुष्टलों पूर्णलाघवें, ।
शिवरामा वांछित मागावें, । मागसी तें देईन आइकें." ॥ ३ ॥

राजा म्हणे "हाच वर । जो तूं परम परात्पर, । मज भवतापीं तापल्या फार । साक्षात्कारें भेटलासी. ॥ ३१ ॥ तूं वरदायकांचा राणा, । मी अन्य वरचि मागेना; । मी मायबाप माझी अंगना । तुझ्या सन्निधाना वोळगो. ॥ ३२ ॥ हा वैश्य पद्माकरमूर्ती । सुनयन त्याचा पुत्र निश्चितीं । इतुकिया आम्हां जगत्पती । पार्श्ववर्ती करावें." ॥ ३३ ॥ यावरी ते कीर्तिमालिनी । वंदूनि भावें शूळपाणी । सांबशिव तोषवुनी । आवडोनी वर मागे. ॥ ३४ ॥ "चंद्रांगद माझा पिता, । सीमंतिनी माझी माता, । त्यांसि आपणाजवळी जगन्नाथा । ठाव तत्वतां त्वां द्यावा." ॥३५॥ सर्वांसि मज माझ्या ठिकाणीं, । म्यां दिधला भरवसेनीं । ऐसें बोलोनि शूळपाणी । अंतर्धानीं राहिला. ॥ ३६ ॥ तो राजाही अलभ्य देवांला । शिवप्रसादें वर लाधला । कीर्तिमालिनीसि स्वलीला । सुखसोहळा भोगितू. ॥ ३७ ॥ चढतेनि वीर्यें शौर्येंसीं । राज्य केलें दहा सहस्र वर्षीं । राज्य देउनी पुत्रासी । शिवपदासी पावला. ॥ ३८ ॥ राजा चंद्रांगद आपण । सीमंतिनीसहित होऊन । भावें करुनी शिवपूजन । शिवठिकाण पावला. ॥ ३९ ॥ हें पवित्र अघनाशन । अति रहस्य शिवगुणकथन, । जो ऐकवी किंवा करी पठण, । शिवपद भोगून पद पावे. ॥ ४० ॥ रहस्य कथा पावनी, । पापताप, करी धुनी, । कीर्ति पूर्णानंदवनीं । शिवराम होउनी बोलतूं. ॥ ४१ ॥ अचेतनासि चेतवी । जैसा खांबसूत्रीं लाघवी, । तेवीं हा पूर्णानंद गोसावी । मज मुक्याकरवीं बोलवित. ॥ ४२ ॥ आपण वक्ता आपण वैखरी, । आपणाचि झाला अक्षरीं । आपणाचि होउनी अंतर्बाहेरी । दावी थोरी कथेची. ॥ ४३ ॥ लक्ष्मीनारायण जगत्पिता । यापरी स्वयें ग्रंथकर्ता, । रसाळ बोले शिवभक्ता । सावधान श्रोतीं परिसावी. ॥ ४४ ॥

इति श्रीब्रह्मोत्तरखंडे वज्रायुचरित्रवर्णनं नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

## आरति.

जय जय आरति देवदयाळू, । तनु मन समुदें तुजवरि ओंवाळूं । पाणी घालुनि मी ममतेसी । भजती निकट तयां वळंगसी. ॥ १ ॥ भक्त चिरायुषी मागुनी वनिता, । त्याला दिधली मग मज समता ॥ २ ॥ जीव

चेतल्याविणें नेदिसि कवडी । भोळा म्हणविसी अभिनवप्रौढी. ॥ ३ ॥ देणें घेणें सारुनि देवा । भक्तासी देसी निजसुखठेवा. ॥ ४ ॥ पूर्ण जगीं शिवरामस्वरूपें । प्रगटसि उपडोनि गुणमय रोपे. ॥ ५ ॥

## इति चतुर्दशोऽध्याय आरति समाप्त.

---

## ॥ श्री सांबसदाशिवाय नमः ॥

ऋषभयोग्याचें महिमान । तुम्हांसि कथिलें म्यां आपण, । आणिकही सामर्थ्य गहन । मी सांगेन शिवभक्ताचें. ॥ १ ॥ सांगेन सामर्थ्य भस्माचेंही । शिवभक्ताची थोर नवाई, । जें ऐकतां पापी तेही । कृतकृत्य देहीं पैं होती. ॥ २ ॥ कोणी वामदेवाभिधान । शिवयोगी होता जाण; । शांत निर्द्वंद्व मनें । समदर्शन निःसंगु. ॥ ३ ॥ स्वरूपानुभवें क्रोध जिंती, । गृहदारांची नाहीं गुंती; । परि गृहाविण संतुष्ट चित्तीं । अतर्क्य गती निजमौनें. ॥ ४ ॥ भस्मउधळण साजे शरीरीं, । जटामुगुट बाणला शिरीं; । अजिन वल्कलांबरधारी, । भिक्षाच भारी परिग्रहा. ॥ ५ ॥ तो लोकीं करित विहार, । लोकानुग्रहीं तत्पर, । तो क्रौंचारण्य महाघोर । अवचट मुनी प्रवेशला. ॥ ६ ॥ त्या अरण्यामाजि कोणी । ब्रह्मराक्षस होता बहुत दिनीं, । अत्यंत पीडिला क्षुधातृषांनीं । योगिया दुरुनी देखिला. ॥ ७ ॥ आधींच क्षुधेनें खवळला, । योगी देखतां चौतळला; । मुख पसरोनि धांवत आला । त्या मुनीला ग्रासावया. ॥ ८ ॥ त्याच्या अंगस्पर्शेकरून । तत्काळ निष्पाप झाला पूर्ण । विसरूनि ब्रह्मराक्षसपण, । जन्ममरणाविरहितु. ॥ ९ ॥

### पद. ( झंपा—ताल ).

जेविं चिंतामणी लोहातें लागोनि ते क्षणीं हेम होउनि जाये, ।
जंबूचे जीवनीं मृत्तिकास्पर्शनीं सुवर्णता पूर्ण पावोनि ठाये. ॥
मानससरोवरीं काक येती जरी तरी हंसता जेविं त्या प्राप्त होये ।
तेविं शिवरामसत्संगमें अवचट पालटोनि स्वतःसिद्ध राहे. ॥ १ ॥

मरतया प्राणिया पीयूष आलिया आयुष्यवृद्धीनें देव होतु, ।
तेविं शिवभक्तसंदर्शनें स्पर्शनें पाप जळोनि जातु; ॥
चित्प्रभेच्या सुखें बोलतां कौतुकें आत्मठेवा करालागिं येतु, ।
संत दुर्लभ याचिलागीं सत्संगमें राक्षस पालटे याचि हेतु. ॥ २ ॥
क्षुप्तिपासेनें जो पीडिला काननीं तो महत्संगमीं तृप्त झाला, ।
त्या मुनिचें तनुउधळणस्पर्शनें ताप तापासि संहार झाला; ॥
पूर्वजन्मस्मृति पावोनियां यतिपादपद्मीं नमस्कार केला, ।
हात जोडोनि जय जय शब्दपूर्वकें प्रार्थितु पूर्ण शिवरामजीला. ॥ ३ ॥

## पद. ( राग धनाश्री ).

चिन्मयमूर्ती दयापर भवरवितापलिया पीयूषसिंधू ।
तव पदरजसंदर्शनमात्रें सुटला बंधप्रकृति सिंधू. ॥ १ ॥
उद्धरीं रे श्रीगुरुराज दया करीं मजवरि रे. ॥ ध्रु० ॥
कोणीकडे मी दुर्धर राक्षस जीव भयंकर अघराशी,
कोण पहा करुणानिधि केवळ शिवपर अवचट तूं जडलासी; ।
घोर महादुःखसागरीं वाहत म्यां धरिलें तव पदपद्मा, ।
तव सन्निधानें पारचि होतों पूर्णानंदगुरू शिवरामा." ॥ २ ॥

पुसे वामदेवो तया राक्षसासी,
"वनीं येथ तूं कोण कां बा अहेसी ? ।
अशा ह्या अवस्थेसि कां पावलासी ?
तुझा सर्व वृत्तांत सांगें अम्हांसी." ॥ १ ॥
वनचर मग बोले वंदुनी संतपावो,
"क्षितिपति गतजन्मीं पंचविंशाचि याहो. ।
सकळ यवनराष्ट्रा शासिता मी प्रतापी,
अघविषयगिरींद्रू पुण्य नेणें कदापि, ॥ २ ॥
नामें दुर्जय वीर्यवंत अकृपा प्राण्या वृथा हिंसकू,
दुष्टाचार कलत्र, फार तरिही कामासि मी पायिकू; ।
सैराटें रहटें जितेंद्रिय नव्हे, तारुण्यमस्तीनरें
चेष्टा, आणिक एक तें परियसा जें दुष्ट मी आचरें. ॥ ३ ॥

## सवाई.

प्रत्यहिं नूतन नारिस भोगित यास्तव सर्वहि देशस्त्रियांसी,
आणुनियां दुत धाडुनियां मग भोगित नित्य नव्या तरुण्यांसी;
त्या मग कोंडुनि राणिवसाउज्जु आणवि अन्य स्त्रियांसि बळेंसीं,
भोगुनि सर्वहि राष्ट्रिंचिया मग नातळें आतळल्या युवतींसीं, ॥ १ ॥

घातलिया कर ज्यां मग त्यांसि दुजा कर चालवि केंवि तयांला
त्या मग कारगृहीं पडिल्या दिनरात्रिंहि वर्षत शापशिव्यांला.
ताडुनि झोडुनि आणवितां चहुं वर्णिचिया भंवत्या युवतींला,
मग राष्ट्रपुरस्थित विप्र सपत्निक जात पळोनिच अन्य स्थळाला. ॥ २ ॥

कन्या सभर्तृक तशा विधवा व्रतस्था,
आणीक कामकुशलाहि रजस्वला त्या; ।
ऐशा अपार वनिता पण भोगिल्या कीं,
प्रत्येक त्यांत शतशांसि वदेन शेखीं. ॥ ४ ॥

## पावसवाई.

तीनशें ब्राह्मणांच्या स्त्रिया भोगिल्या,
चारशें क्षत्रियांच्याच चौढाळिल्या. ।
वैश्यनारीच त्या सातशता भोगिल्या,
शूद्रिणींच्या सहस्रांसि संपादिल्या. ॥ १ ॥

चांडाळ स्त्रियांचें शत । पुलिंदांचें सहस्र येथ. । शेलशांचें पंचशत । चतुःशत रजकांचें. ॥ १० ॥ वेश्यांसी तरी संख्या नाहीं, । ऐसा दुरात्मा मी पाहीं; । तथापि माझिया ठायीं । नोहेचि कांहीं कामतृप्ती. ॥ ११ ॥ एवं दुर्विषयीं आसक्त, । सदा अन्न पाणीं रत; । यौवनीं झालों बहुरोगार्त । तेणें संतप्त चरफडित. ॥ १२ ॥ रोगें व्यापिलों देहीं, । उदरीं संततीही नाहीं; । पीडिलों वैरियांच्या समुदायीं, । सर्व जनींही त्यागिलों. ॥ १३ ॥ जो चेवला स्वधर्मापासुनी । त्याचे पितर पडती पतनीं, । अपकीर्ती ये ठाकुनी; । दुर्गती राणी त्यासि वरी. ॥ १४ ॥ आयुष्य सर्वे नासत, । भाग्याला ठायींचे ठायीं विसंबत । शेखीं काळा वर-

पडा होत । नाडोनि जात इहपरा. ॥ १५ ॥ तों दैवगती मेलों, । दूतीं यमलोकासि नेलों; । घोर नरकामाजि पडलों, । भोगूं लागलों कर्मफळें. ॥ १६ ॥ त्या नरककुंडाभीतरीं । पचिन्नलों तीन सहस्र वर्षेवरी । तेथें रेत पीत अधोवक्रीं, । यमकिंकरीं पचिन्नलों. ॥ १७ ॥ मग पापवशें निर्जळ वनीं, । उपजलों पिशाच होउनी, । सर्वांग व्यापिलों सहस्त्रशिश्नीं । क्षुधा तृषेनी आहळत. ॥ १८ ॥ दिव्य सहस्र वर्षांवरी । पिशाचत्व पावलों यापरी; । त्या मग द्वितीया जन्मांतरीं । झालों भारी मी व्याघ्र. ॥ १९ ॥ तृतीय झालों अजगर, । चतुर्थीं हो वृक भयंकर । पांचवे जन्मीं रानडुकर, । साहावे कुक्कुर जाहलों. ॥ २० ॥ सातवे जन्मीं श्वान, । अष्टमीं श्रृगाल मी जाण । गवययोनीं नववें जनन । दहावें चिन्ह मृगयोनी. ॥ २१ ॥ अकरावे जन्मीं मर्कटवेश, । द्वादशीं गीध कर्कश; । त्रयोदशीं झालों मुंगुस, । जन्म वायस चतुर्दशीं. ॥ २२ ॥ पंचदशीं भिल्लयोनी घडे, । सोळावे योनीं रानकोंबडे । सतरावें गर्दभ धडफुडें । अठरावें रोकड मार्जार. ॥ २३ ॥ एकुणिसावें मंडूक, । विसावा कूर्मजन्म देख; । एकविशीं मत्स्य निष्टंक । जन्म मूषक बाविसावा. ॥ २४ ॥ तेविशीं वोखटें पाखिरूं; । चोविसे जन्मीं हातिरूं, । पंचाविसामाजि थोरू । झालों दुर्धर ब्रह्मराक्षस. ॥ २५ ॥

क्षुधातृष्णादाहेंकरुनि निरहारीं पिडियलों,
विलोकूनी तूतें समुळचि गिळायासि भिडलों,
तुझ्या अंगस्पर्शें स्मरत बहुजन्मस्मृति मला,
विरक्तीनें कोठा निजहृदयिंचा स्वस्थ जहला. ॥ ५ ॥

प्रभावो हा ऐसा प्रगट तुज कोठोनि जडला ?
तपें कीं तीर्थानें हरिहरपुजेनें गवसला;
समूर्दे हें देवा प्रगटुनि मला सांग बरवें,
मनेंसीं मी आलों तुज शरण सप्रेम विभवें. ॥ ६ ॥

## पद.

वामदेव बोले त्या राक्षसासीं । बा ऐक अभिप्रावो. ॥ १ ॥ हा भस्मप्रभावो । येथें नाहींच संदेहो. ॥ ध्रु० ॥ मद्गात्रसंगें तुझ्या मनाचा । गेला महामोहो. ॥ २ ॥ हें भस्मसामर्थ्य संपूर्ण ऐक । जाणे शिववामदेवो. ॥ ३ ॥

शिवसामर्थ्य जैसें गहन । तैसेंचि भस्माचें महिमान, । येविषयीं इतिहास सांगेन । होता ब्राह्मण तुजऐसा. ॥ २६ ॥ तो राहे द्राविडदेशीं, । स्वधर्मवारें नावडे त्यासी; । कर्में पावला शूद्रत्वासी । सदाचारासी विसं_ बतां. ॥ २७ ॥ निष्ठुर करी चौर्यवृत्ती । कदाचित जारकर्मप्राप्ती । अखंड वैश्याची संगती, । शूद्रें रात्रीं मारिला. ॥ २८ ॥ त्याचें शव तें कर्महीन । गृहाबाहेर टाकिलें वोढोन; । भस्मींचें उठिलें एक श्वान । त्या शवावरून चालिलें. ॥ २९ ॥ नरकामाजि त्यासि पाडितां, । तों शिवदूत आले सवेगता; । विमानीं बैसवुनी त्या पतिता । बळें शिवपंथा चालिले. ॥ ३० ॥ यम येउनी म्हणे शिवदूतांसी । 'हा दुष्टात्मा पापराशी, । यासि कैंविं नेतां शिवलोकासी ? ' । ते यमासी बोलती. ॥३१॥

## पद. ( धनाश्री ).

'याचिया शवविग्रहावरी बाहू वक्षस्थळ ललाट सर्वही अवयवीं तें भस्मचिन्ह पाहीं जाउनि । याचिलागीं निरोपियलें गिरिशें ययासि आलों येथें । वारावयासि तुज नाहीं अधिकारू.' ॥ १ ॥

ऐसें बोलोनि द्विजनाथा । विमानीं बैसवुनी तत्वतां, । नभीं सुरासुरां देखतां । मंगलपंथा ते गेले. ॥ ३२ ॥ यालागीं हें भस्म जाण । सर्व पापांस शोधन, । हेंचि शिवांगींचें निजभूषण । लेऊनि अनुदिनीं मिरवतों." ॥ ३३ ॥ ऐकोनि भस्माचें सामर्थ्य । ब्रह्मराक्षस पुन्हा बोलत, । "मागुती भस्ममहिमा येथें । उत्कंठित चित्त ऐकावया." ॥ ३४ ॥ देवयोगियां अग्रगणी । मी धन्य झालों तुझ्या दर्शनीं; । मज या घोर जन्मापासोनि । त्वां कृपेनें काढावें. ॥ ३५ ॥ माझें जन्मांतरींचें सुकृत । कांहीं आहेसें मज गमत, । तुझ्या प्रसादें निश्चित । सुटेन येथें भवबंदीं. ॥ ३६ ॥ त्या पार्थिव जन्मांतरीं । एका शिवभक्तासि स्नेह करीं; । सफळित दिली धरित्री । वृत्ती करीं नित्य नवी. ॥ ३७ ॥ यमही बोलिला ते अवसरीं । 'हा पंचविसावे जन्मांतरीं । कोणी एक्या सत्संगें तरी । मुक्त संसारीं होईल.' ॥ ३८ ॥ तें आजि कळलें सुकृत । कांहीं होतें प्राग्जन्मार्जित । जया निर्जळ अरण्याआंत । आलासि येथें शिवयोगी. ॥ ३९ ॥ आतां मी घोर पापकारी । संसरतों गा जन्मांतरीं । कृपा-

निधी उद्धार करीं । भस्मेंसि करीं अभिमंत्रें. ॥ ४० ॥ कैसें धरावें या भस्माशी ? । कोण मंत्रविधी कैशी ? । कोणे काळीं कोणे देशीं ? । हें विस्तारेंसीं सांगावें. ॥ ४१ ॥ तुम्हां ऐसे संत दयाकर । सदा लोकहितासि तत्पर, । जैसे पदार्थ हे तरुवर । जगदोद्धार तेवि करिती." ॥ ४२ ॥ देखोनि राक्षसाचा सद्भावो, । पुन्हां आनंदोनि वामदेवो, । शिवभस्माचा प्रभावो । वर्णी पहा हो सादरें. ॥ ४३ ॥ रसाळ हें निरोपण, । शिवभक्ताचें महिमान; । भस्ममहिमा असाधारण । सूत आपण निरोपी. ॥ ४४ ॥ लक्ष्मीनारायण गुरुमूर्ती । आपुले अंगींची भस्ममहती । स्वसुखें सांगे भक्ताप्रती । लक्ष्मीपती बळात्कारें. ॥ ४५ ॥ पूर्णानंद नारायण । शिवरामनाम स्वयें धरून, । स्वानंदें करी शिवकथन । करूनि टिपण देशभाषा. ॥४६॥ ब्रह्मोत्तरखंडींची हे कथा । स्कंदपुराणीं सूत वक्ता, । सावधान व्हावें श्रोता । उबग सर्वथा न मानावा. ॥ ४७ ॥ तंव श्रोते म्हणती सादर "तुझे बोल आधींच मधुर, । वरी कृपामृत सिंचोनि गुरुवर । शिवकथा सादर वदवित. ॥ ४८ ॥ तें तुझें वचन ऐकतां सांग । तेथें कैंचा येईल उबग । अंतरीं भरलिया अंतरंग । प्रेमाचा रंग माजतसे. ॥ ४९ ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे भस्ममहिमावर्णनं नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

## आरति.

जय देव जय देव जय वामदेवा । आर्ते आल्यां देशी सौभाग्यठेवा. । ॥ ध्रु० ॥ ब्रह्मचि असतां आपण विसरुनि भ्रमयोगें । देहबुद्धीनें राक्षस झाले जे अंगें । निवाल्या प्रबोध भस्माचें संगें । जन्मांतरापासुनि तुज पावति वेगें. ॥ १ ॥ लोळति जन जे तया भस्माचे ठायीं । ते भलत्या योनीचे होतु निजदेहीं । शिवपदप्राप्ती होये त्यांच्या समपायीं । म्हणूनि भस्मा ऐसा तारक आन नाहीं. ॥ २ ॥ ऐसें तूझें भस्म धरिती जे अंगीं । ते तंव देहीं असतां केवळ शिवयोगी । शिव संपूर्ण सेवुनि खेळति सत्संगीं । ते जन शिवरामाचें भूषण अंगांगीं. ॥ ३ ॥

आरति समाप्त.

---

॥ श्री सांबाय नमः ॥

पद.

नागवे म्हणुनी वेद परतले नेति म्हणुनि निजबोधें रिघ केला जेथें, । त्वरित फेडुनि तनुकवचातें विसरुनि सर्वहि अहंतेतें. ॥ १ ॥ ते शिवयोगी शिवचि होउनि शिवा भजती. ॥ ध्रु० ॥ ज्याच्या करणगृहासि विसरले विषय येवों । स्वसुखें निजले आत्मशेजे, । तरूनि संकल्पाचें ओझें । योगभूमिकेचे अढळ राजे. ॥ २ ॥ ज्ञान विज्ञान हळुहळु सहज राहिलें दुरी, । ज्ञेय सद्रूप शिव झाले; । व्याप्य व्यापक त्याचेंही भान गेलें । पूर्ण शिवरामीं ठेलें. ॥ ३ ॥

त्या शिवयोग्याची संगती, । अनुदिन दे विश्रांती; । धन्य ते केवळ पुण्यमूर्ती । जे शिवभक्ती तारक. ॥ १ ॥ तो शिवयोगिया वामदेवो, । त्यासी बोले स्वयमेवो, । " भस्माचा सांगेन प्रभावो । तो प्रभावो अवधारीं. ॥ २ ॥ पूर्वी मंदरपर्वतीं । तेथें सर्व धातूंची वस्ती, । नाना द्रुम विराजती, । नानाविध वसती प्राणिये. ॥ ३ ॥ तये ठायीं कदाचित । काळाग्नि रुद्र भगवंत । स्वइच्छेनें क्रीडा करित, । विश्ववंदित परेशु. ॥ ४ ॥ रुद्रांचिया शतकोटी । .................... । .................... । .................... .................... ॥ ५ ॥ शोभे सृष्टीं त्रिलोचन । तेथें मिळाले सुरगण, । देवेश, अग्नी, वायू, यम, वरुण, । स्वयें वैश्रवण पातला. ॥ ६ ॥ गंधर्व चित्रसेनादिक, । पन्नग, खेचर, सकळिक । विद्याधर सिद्धपुरुष, । सिद्धपुरुषसमुदावो. ॥ ७ ॥ वशिष्ठादि ब्रह्मऋषी, । नारदादि देवऋषी । दक्षिणादि प्रजेश त्या ठायासी । सहपितरांसी पातले. ॥ ८ ॥ उर्वशीआदि अप्सरसा जाण, । चंडिकादि मातृकागण, । आदित्य, वसू, अश्विनीसूनु, । आले टाकून वैश्वदेव. ॥ ९ ॥ आणिकही भूतनाथ । लोकसंहारक समर्थ, । महाकाळ नंदी तेथें । पार्श्वगत शिवाचे. ॥ १० ॥ वीरभद्र धनुर्धरु, । शंकुकर्ण मोठा वीरु, । घंटाकर्ण मणिभद्र, । वृकोदर दुर्धर्ष. ॥ ११ ॥ कुंडोदर आणि विकट । कुंभोदर तो बलिष्ठ, । मंदोदर, भृंगीरट, । केत आदट कर्णधार. ॥ १२ ॥ भूतनाथ याविण आन । महाकाय महाप्रवीण, । कृष्णवर्ण श्वेतवर्ण । मंडूकसमान कांतीचे. ॥ १३ ॥

हरिद्वर्ण धूम्र धूसर, । पिंवळे लोहित कर्बूर, । चित्रवर्ण विचित्रशरीर । बळें दुर्धर चित्रलीळ. ॥ १४ ॥ नानाविध आयुधें करीं । मिरवती नाना वाहनांवरी; । कोणी व्याघ्रमुखें भारी, । निर्विकारी शूकरमुखें. ॥ १५ ॥ कितेक तेथें नक्रवदन, । कोणी सारमेयाचें आनन; । कोणी शृगालमुख जाण । उष्ट्रवदन कित्येक. ॥ १६ ॥ कोणी शरभमुखाचे । सिंह गृध्र बकाननाचे; । कितेक दोंतीं वक्रांचे । बहु वक्रांचे कितेक. ॥ १७ ॥ एवं द्वित्रिचतुरहस्ती । अनंतहस्ती अहस्ती । बहुपाद अपद मिनले असती । एक श्रोत्री चतुःश्रवण. ॥ १८ ॥ एकनेत्र चतुर्नयन । लांब कितेक वामन; । परमेश्वरातें आवरोन । उपासना करितातीं. ॥ १९ ॥ तेच वेळे प्रेमें करूनि । आला सनत्कुमार मुनी, । अवलोकिला शूळपाणी, । आनंद मनीं न समाये. ॥ २० ॥

पद.

देवदेवेश विश्वेश रविकोटिसमतनु महाबळयक्षसंक्षोभहंसा, ।
प्रळयअनळाटोप जटिलभास्वद्रूप भाळनयनास्फार भव्यभासा, ।
विचचूडारत्नशशिखंडमंडणा, वासुकितक्षकश्रवणभूषा, ॥ १ ॥

फणिशिरोरत्न, सहकंकणांगदचारुमुद्रिकानंतपरिभूषितांगा, ।
व्याघ्रचर्मावरण, भोगिकंठाभरण, फणिसहस्रारक्तकटिसूत्रलिंगा, ।

क्षुद्रनिजकटिकादर्शनमध्वरुचिपादराजीवमंजीरशृंगा, ।
पाशतोमरधनुशूळखट्वांगधर शिवरामपूर्ण निजहृदयसंगा. ॥ २ ॥

अनिर्देश जो ईश चित्तेंद्रियांसीं,
दुरी अग्रह्य स्वयें स्वप्रकाशीं. ।
स्फुरद्रत्नसिंहासनीं रूढ शंभु,
मुनी वंदिती टाकुनीयां विलंबु. ॥ १ ॥

योगीराज सनत्कुमार विनयें जोडोनि हस्तांजुळी,
भक्त प्रेमभरें स्तवी उपनिषद्भें स्वरीं मंजुळीं;
दाटे सात्विक भाव तो जिरवुनी जेथील तेथें मुनी,
मोक्षप्रापक सर्व धर्म पुसतृ अत्यादरें वंदुनी ॥ २ ॥

पैं जे हेतुला समूह पुशिला,
  सद्धर्म तें तें शिवराज बोलिला. ।
सनत्कुमारें नमुनी उमापती,
  स्वयें करी प्रश्न अपूर्व मागुती. ॥ ३ ॥

पद. ( राग वेताळी. )

मुक्तीसि हेतु समग्रही धर्म तुवां कथिले भूतनाथा, । आणिक अल्प-प्रयासचि न लागत देत महत्फळ. ॥ १ ॥ तो धर्म सांगें, । पाहें मज-कडे करुणापांगें. ॥ ध्रु० ॥ बहुत प्रयासिक धर्महि सांग घडल्या काळें फळ दे, । यास्तव फार लिगाड नसे आणिक फळ तें शिवसुख न संधे. ॥ २ ॥ सर्व जना उपेगा येईल नेदी श्रम शरिरासी, । पूर्ण मनोरथ करूनि प्रकाशीं सत्वर शिवरामासी." ॥ ३१ ॥

सकळ धर्मवरिष्ठ सुखार्थिला,
  उपनिषद्वदनींच प्रकाशिला; ।
शिवत्रिपुंड्रकळा धरणें जनीं,
  शिव म्हणे वर धर्मचि हा गुणीं. ॥ ४ ॥

मुनी पुसे मागुती, । "शिवराजया जगत्पती । ते त्रिपुंड्रविधीची स्थिती । कृपामूर्ती मज सांगें. ॥ २१ ॥ स्थानें किती ? द्रव्य तें कोणतें ? । कवण शक्ती ? कवण दैवतें ? । काय प्रमाण ? कोण कर्तें ? । मंत्रार्थें फळ कायी ? ॥ २२ ॥ हें सर्वही लक्षण, । त्रिपुंड्राचें निजविधान, । लोकानुग्रहार्थ पूर्ण । मजलागून सांगावें." ॥ २३ ॥ मुनीतें म्हणे "ऐक साचें । जें जाळिलें गोमयाचें, । शुद्ध भस्म आमुचें, । त्रिपुंड्राचें तें द्रव्य. ॥ २४ ॥ भस्म घेउनी हस्तकीं । सद्योजातादि पंचानुवाकीं, । अग्निरित्यादिनें सम्यकीं । मंत्राभिषेकीं भस्मातें, ॥ २५ ॥ मानस्तोकें मंत्रीं मर्दावें, । त्र्यंबकें शिरीं लावावें । ललाटीं, भुजद्वयीं, लेपावें । मंत्रवैभवें आयुषा. ॥ २६ ॥ तन्तन्मंत्रें क्रमेंकरुनी । स्कंधीं लावावें शिवभक्तांनीं, । तीन, तीन रेखा स्थानस्थानीं । क्रमेंचकरुनी लावावें. ॥ २७ ॥ भ्रूमध्य आरंभुनी, । भ्रूपाव तो डावलुनी, । अंगुष्ठरेखा वोढुनी, । वोढाव्या दोन

आंगुळी. ॥ २८ ॥ प्रतिलोमीं, मध्यमा, अनामिका, । ऐशा वोढिल्या तीन रेखा । यापरी त्रिपुंड्रासी प्रत्येका । नवही ऐका दैवतें. ॥ २९ ॥ आकार गार्हपत्यहुताशन, । भूमितत्व आत्मा रजोगुण, । ऋग्वेद क्रियाशक्ति जाण । प्रातःसवन महादेवो. ॥ ३० ॥ हे इतुकीं मिळोनि येथें । पहिल्या रेखेचीं दैवतें, । दुजा रेखा दैवतातें । सांगेन तूतें मुनिवर्या. ॥ ३१ ॥ उकार दक्षिणाग्नी गगन । यजुर्वेद माध्यंदिन सवन । इच्छाशक्ती अंतरात्मा पूर्ण । महेश्वर जाण देवता. ॥ ३२ ॥ मकार, आहवनीय हुताश, । परमात्मा अंतरिक्ष त्यास । ज्ञानशक्ती सांब शिव परेश । तृतीय विशेष ते सवन. ॥ ३३ ॥ याआधीं दैवता त्रिपुंड्राचिया । नित्य नमस्कार करूनियां, । मग त्रिपुंड्रा धरावें मुनिराया । निस्तरावया भवसिंधू. ॥ ३४ ॥ हें केवळ महेश्वरव्रत । सर्व वेदीं प्रख्यात । मुमुक्षीं सेविलिया येथें । नायकती जन्ममृत्यू. ॥ ३५ ॥ चौंकर्णीं चौंआश्रमींचें । जे धारण करिती त्रिपुंड्राचें । ब्रह्महत्यादि सर्व पापांचे । बाध साच त्यां नाहीं. ॥ ३६ ॥ त्रिपुंड्रमहिमा नेणतां, । मंत्रोच्चारणही नसतां, । सहज त्रिपुंड्र लावितां, । पाप सर्वथा न बाधी. ॥ ३७ ॥ भक्तिवैराग्यज्ञानबळीं । हे त्रिपुंड्र ज्याचे कपाळीं, । तो कार्यकारण करी होळी । चंद्रमौळी निजांगें. ॥ ३८ ॥ परद्रव्यापहरण, । परदारापरिगमन, । परनिंदा, परक्षेत्रहरण, । परपीडन सर्वदा. ॥ ३९ ॥ आरामकृषिदहन, । गृहदाहादि कर्म जाण, । असत्य बोलणें पैशुन्य । निष्ठुरपण, दुर्बुद्धी. ॥ ४० ॥ वेदविक्रय साक्षी कूट । नीचसेवाव्रत योग कपट, । इत्यादि पाप उद्भट । करी सपाट त्रिपुंड्र. ॥ ४१ ॥ गो, भू, हिरण्य, मही, शीतळ । अन्न, धान्य, वस्त्र, कंबळ, । इतुक्यांचाही सर्वकाळ । पाप सबळ प्रतिग्रहो. ॥ ४२ ॥ दासी, वेश्या कुश्चळा । वृषली, नटी, रजस्वला, । कन्या विधवा, अमंगळा । संगीं घडला दोष जो. ॥ ४३ ॥ भक्ष्य, मांस, चर्म, रसादिक । यांचा विक्रय जो अविक । इत्यादि जे असंख्य । बहुधा पातक जें असती. ॥ ४४ ॥ त्रिपुंड्रधारणेनें सत्वर । हीं पापें पावती संहार, । शिवद्रव्याचा अपहार, । निंदा दुर्धर शिवाची. ॥ ४५ ॥ शिवभक्तांचीही निंदा, । प्रायश्चित्त नाहीं अपराधा; । म्हणोनि हीं पापें सर्वदा । पूर्ण प्रबुद्धा नातळती. ॥ ४६ ॥ रुद्राक्ष जयाचे देहीं, । त्रिपुंड्रधारण भाळाचें ठायीं, । तो चांडाळ हो कां त्रिपायीं । सर्व

वर्णांही तो पूज्य. ॥ ४७ ॥ सेविलिया सहस्रतीर्था, । गंगा आदि नाना सरिता; । तो न्हाला जाणिजे सर्वथा, । त्रिपुंडधर्ता जो भाळीं. ॥ ४८ ॥ शिवमंत्रादि सहस्रकोटी । मोक्षमार्गाचिया दिवटी । तेणें जपिल्यापरि होय शेंवटीं, । ज्या ललाटपटीं त्रिपुंड्र. ॥ ४९ ॥ मागें जाहले जे हजार, । पुढें होणारांचे जे सहस्र; । वंशेंसिं पावे मोक्षमंदिर, । जो धरी त्रिपुंड्र ललाटीं. ॥ ५० ॥ दीर्घायुष्य, व्याधिवर्जित, । सकळ भोग भोगुनी येथ, । देहांतकाळीं स्वस्थ । मरण पावत सावधानें. ॥ ५१ ॥ संयुक्त अष्टैश्वर्यगुणीं । दिव्य देहातें लाहुनी, । दिव्य विमानीं बैसोनी । शिवसन्निधानीं तो जाये. ॥ ५२ ॥ विद्याधर, सिद्ध, गंधर्व । इंद्रादिक लोकपाळ सर्व । त्यांच्या लोकीं भोगुनी वैभव । क्रमें शांभवी गति पावे. ॥ ५३ ॥ प्रजाधीश्वराच्या पुरीं । नांदोनि कित्येक अवसरीं, । मग ब्रह्मपद पावोनि निरंतरीं । शतकल्पवरी नांदती. ॥ ५४ ॥ विष्णुलोकीं शतत्रय । नांदोनि मग शिवलोका जाय । तेथें नांदे अक्षय । जन्मभय वारुनी. ॥ ५५ ॥ उपनिषदांचिया कोटी, । आलोडुनि घडि घडी, । मोक्षाचियेचि जोडिली जोडी, । हे त्रिपुंड्रप्रौढी विख्यात. ॥ ५६ ॥ हें त्रिपुंड्राचें महिमान । तुज म्यां सांगितलें संपूर्ण; । तें हृदयीं राखावें" ऐसें बोलुन । अंतर्धान शिव झाला. ॥ ५७ ॥ मग त्या ब्रह्मलोकासी । गेला सनत्कुमार ऋषी, । तुजही निर्मळ स्फूर्ती ऐशी । भस्मस्पर्शीं प्रगटली. ॥ ५८ ॥ तूंही त्रिपुंड्र धरीं अपूर्व," । ऐसें बोलोनि वामदेव । भस्म अभिमंत्रून सावेव । राक्षसासी स्वयमेव देता झाला. ॥ ५९ ॥ येरें घेऊनि तीन अंगोळी । त्रिपुंड्र वोढिलें कपाळीं, । त्यजूनि राक्षसत्व तेंचि वेळीं । प्रकाश बंबाळी झळकला. ॥ ६० ॥ दिव्य स्वरूपें सुंदर, । दिव्य भूषणें अलंकार, । दिव्यतेजें झळकला अपार, । केला नमस्कार वामदेवा. ॥ ६१ ॥ भावें प्रदक्षिणा करुनी । वंदिला वामदेव मुनी, । बैसोनि दिव्य विमानीं । शिवठिकाणीं पावला. ॥ ६२ ॥

पद—( धाटी राग—कामबोध ).

सद्य त्रिपुंड्र राक्षसदेहीं । शिवपद चढला साधनेंविनाही. ॥ १ ॥
भस्मप्रभाव बरा । न कळे ब्रह्मादिक अमरां. ॥ ध्रु० ॥
दूर निवारुनी रजतमगोवी । नामरूपातित शिवपद दावी. ॥ २ ॥
पूर्णगुरू शिवरामा पाढियें । भवनिधिं पतितां पाववि थडिये. ॥ ३ ॥

ब्रह्मराक्षसा ब्रह्मप्राप्ती । देवोनि वामदेवो मूर्ती, । स्वेच्छा चालिला सहज-स्थितीं । स्वसुखें क्षिती विहरतु. ॥ ६३ ॥ जे हे भस्ममहिमा ऐकती, । कीं सद्भावें जे पढती, । त्यांसी अचूक शिवप्राप्ती । पुनरावृत्ती-वांचुनी. ॥ ६४ ॥

**कथयति शिवकीर्तिं संसृतेर्मुक्तिहेतुं प्रणमति शिवयोगी ध्येयमीशांघ्रिपद्मं । रचयति सितभस्मोद्भासि भालत्रिपुंड्रं न पुनरिह जनन्यां गर्भवासं भजध्वं ?**

भवभय निरसी त्या शंभुकीर्ती वदा रे,
मुनिमय शिवयोगी शंभुतें ध्यासु ध्यारे ।
झळझळित कपाळीं या त्रिपुंड्रासि लावा,
पुनरपि नय यारे गर्भसंसारगांवा. ॥ ९ ॥

परमपावन रहस्य । भस्मप्रभावविशेष, । वर्णी स्वमुखें महेश । कथा सुरस आंजिची. ॥ ६५ ॥ बाप श्रोते हो तुम्हांलागीं, । भस्ममहिमा वर्णी शिवयोगी; । ते कथा आजिचे प्रसंगीं । या शिवरंगीं माजिली. ॥ ६६ ॥ लक्ष्मीनारायणा शरण । झालें भस्ममहिमा वर्णन । आतां केवळ भाव-लक्षण । ऐका पूर्ण श्रद्धेसीं. ॥ ६७ ॥ पूर्णानंद कैवल्यदाता । स्वयेंचि वक्ता आणि वदविता, । शिवराम निमित्त करूनि आतां । शिवपरकथा चालवी. ॥ ६८ ॥ सूत्रधारी आपणां लपवी । पुतळ्याच नाचती ऐसें दावी; । तैसा नारायण गोसांवी । शिवरामीं वदवी शिवकथा. ॥ ६९ ॥ खांबसूत्रें दोनी पृथग्भूतें, । नाचवी, नाचती भिन्न तेथें । तो दृष्टांत न साहे येथें । येथील अद्भुत तें कैसें ? ॥ ७० ॥ बोल बोलवी बोलता, । नीति आपणचि होउनि स्वतां । ग्रंथ आणि ग्रंथकर्ता । स्वयें तत्वता सद्गुरुरावो. ॥ ७१ ॥ यापरी एकात्मता करून । दावितसे ग्रंथ निर्माण । तेथें पाहतां पाहतां जाण, । तेंही एकपण न राहे. ॥ ७२ ॥ ऐसा अभिनव बोलका । माझा पूर्णानंद सखा; । ग्रंथमिषें सहज देखा । निजात्मसुखा लुटिती. ॥ ७३ ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे त्रिपुंड्रमहिमावर्णनं नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

## आरति.

जय देवी जय माय जय वो विभती । तुझेनि स्पर्शें जड जीव अंगें शिव होती. । आरतें आरति करुनी तुझी निजमूर्ती । न्याहाळितां मावळली बाहेरिल स्फूर्ती. ॥ ध्रु० ॥ तेजाहुनि परतें जें जें कां निजदीक्षा । कळिकाळ मग वंदी त्याच्या पदरक्षा, । त्या तेजेंकरूनी गोगोमय रक्षा । सर्वांगीं लाविती जे तव निजरक्षा. ॥ १ ॥ सद्चिद्आनंद पद एकमेळीं । हेचि त्रिपुंड्रीं वसे ज्याच्या शिरभाळीं, । प्रारब्धाच्या रेखा पुसुनि सहमेळीं । भोगिति शिवसोहळे ते सर्वहि काळीं. ॥ २ ॥ अंगीं जडल्या सवें उधळीसी मातें । तें त्याचें सर्वांग तेजोमय होतें; । तुजसीं मिरवते पूर्ण शिवरामचि कीं ते । यद्यद्विभूतिमत हें कथिलें भगवंतें. ॥ ३ ॥

## ललित.

जाळुनियां माया विद्या वेश्म । करूनि सर्वहि गोमय भस्म. ॥ १ ॥
लावा शिवरक्षा शिवरक्षा । अपुलें गृह संरक्षा. ॥ ध्रु० ॥
नामरूपीं आणू स्फूर्ती । भरलीं दाट ते विभूती. ॥ २ ॥
पूर्ण न्याहाळुनी भाळचंद्र । त्रिपद शिवरामीं त्रिपुंड्र. ॥ ३ ॥

**ललित आरति षोडशोऽध्याय समाप्त.**

---

॥ श्रीसाबाय नमः ॥

## पद.

बारे शिवपद सांभाळा । वारुनि गुणत्रय आभाळा । बोधें मनमळ पाखाळा, । आतां झणिं म्या कळिकाळा. ॥ ध्रु० ॥ जीविंच्या जाळुनि कंदर्पा । गिरिशातें रक्षा अर्पा । तृष्णा विषमय विषसर्पा । भूषण शंभूसि समर्पा. ॥ १ ॥ श्रद्धापीयूषांबुधिमाजी । मज्जन सज्जनसुस-

माजीं, । चिंता न घाला तनुमाजी । पूजुनि शिव तेथें रमा जी. ॥ २ ॥ पूर्ण भवहर पूजावा, । देखोनि भेदचि लाजावा; । शिवरामाचा भव जावा । ऐसा उपाव योजावा. ॥ ३ ॥

ऋषी म्हणती सूताप्रती । केवळ ब्रह्म संतमूर्ती । गुरुत्वें उपदेशिल्या मूढमती । कवण्या पावती गतीतें ? ॥ १ ॥ अथवा ब्रह्मस्थिती नेणत ? । सामान्य गुरू म्हणवित; । तिहीं बोधिल्या जन समस्त, । कोण्या पावत सिद्धीसी ? ॥ २ ॥

पद—( राग–परज ).

मनुजा भावचि तारक रे । भावेंविण येर उपचारिंच्या संपत्ती मारक रे. ॥ ध्रु० ॥ माता जैशी बहु हितकारक, । श्रद्धा तैशिच पाहीं रे. ॥ १ ॥ ग्राव जरी शिवभावें पुजिला फळती सकळही सिद्धी, । मा सद्गुरू शिवरूपें भजल्या । मंगळपद कां नेदी रे. ॥ २ ॥ पूर्ण अबद्धहि मंत्र मनीं निजभावें जपतां फळतो । शिवरामप्रभुचरणीं भावें मिनल्या भवहर कळतो. ॥ ३ ॥

सुत म्हणे "अवधारा हो । येथें मुख्य पाहिजे श्रद्धाभावो, । श्रद्धेनें पूजितां शिळा पहाहो । देवदेवो फळ देतु. ॥ ३ ॥ गुरू मूर्खहि झाला, । तो श्रद्धेनें पूजिला; । सर्व देतो सिद्धीला । श्रद्धाचि सकळां कारण. ॥ ४ ॥ अबद्ध कोणी मंत्र जपत । श्रद्धाफळें तोही फळत; । श्रद्धेनें पूजिल्या उमाकांत, । सर्व फळ देतु नीचासही. ॥ ५ ॥ तप, व्रतें, यज्ञ अपार । दान आणि पूजाउपचार, । श्रद्धेविण निर्फळ समग्र; । वांझ तरुवर पुष्पापरी. ॥ ६ ॥ श्रद्धेचा लेश हृदयीं नाहीं, । वरी चंचळ, बहू संशयी; । त्यासि परमार्थ न मिळे कांहीं । तो संसारवाहीं वाहवला. ॥७॥ मंत्र, तीर्थ, द्विज, देवासी; । योगी, वैद्य आणि गुरूसी । भजावें ज्या ज्या भावनेसीं । सिद्धी तैशी लाहिजे. ॥ ८ ॥ म्हणुनि भावमय विश्व अवघें, । पुण्य पापही भावयोगें, । भावही नासी हीं दोघें । कदापि अंगें नातळती. ॥ ९ ॥ येथें कथा आहे सोपी । तुम्हांसि सांगेन संक्षेपीं, । जें ऐकतां आक्षेपीं । नुपजे कदापि अश्रद्धा. ॥ १० ॥ पांचाळरायाचा सुत । सिंहकेतनामें विख्यात । सर्वगुणीं शोभे अलंकृत, । मानवंत इंद्राचा. ॥ ११ ॥ तो कोणी एके

वेळेसी । सवें कित्येक भृत्येंसीं । निघोनि गेला विपिनासी । पारधीसी खेळावया. ॥ १२ ॥ त्याचा भृत्य शबर म्हणउनी, । कोणी एके फिरतां वनीं, । मोडलें देऊळ बहुत दिनीं । तेणें नयनीं देखिलें. ॥ १३ ॥ त्या देउळीं अति दूर । भग्नलिंग देखे शबर, । म्हणे भाग्य माझें महाथोर । विस्मयें सत्वर तेथ आला. ॥ १४ ॥ पूर्वपुण्यप्रभावेंसीं, । तेणें घेतलें त्या लिंगासी, । मग नेउनी सवेगेंसीं, । राजपुत्रासी दाखविलें. ॥ १५ ॥ 'राया पाहीं या लिंगातें । मज सांपडलें गा येथें, । हें मी पूजीन स्वस्थचित्तें । यथायुक्त उपचारें. ॥ १६ ॥ याचा पूजाविधिविस्तार । मज सांगावा सादर । मंत्रें पूजितां सत्वर, । जेणें महेश्वर संतुष्टे.' ॥ १७ ॥

## पद--( चाल--सोरट ).

ऐशी हे शबराची वाणी । ऐकतांच उदास हांसोनी । परिहास मानुनी । भूप बोलत त्यास. ॥ १ ॥ शबरराया विधिनें शिव पूजीं । आधीं आसनीं स्वस्थ बसोनी । एकट मन योजीं. ॥ ध्रु० ॥ उदक संकल्पासि घालुनि । नवजळें प्रक्षाळुनि । .... .... .... .... .... ॥ २ ॥ आणि चिताभस्म पढियें शंकरासी अपार । चढवुनि तें आधीं मग नैवेद्य देऊं पहारे. ॥ ३ ॥ मागुती धूप दीप निरांजन करीं अभिवाद । गीत, नृत्य, पुष्पांजुळि दे, वंदीं शंभुप्रसाद, ॥ ४ ॥ हे पूजा साधारण प्रिय नित्य आचरें ईसी । पावसी येणेंचि तूं परिपूर्ण शिवरामासी. ॥ ५ ॥

## पावसवाई.

यापरी तूं शिव पूजीं आधीं चिताभस्मपूजनें त्यासी संतुष्टी भारी.
त्या परिहासवचनास शिरीं वंदुनी निजगृहीं रिघुनी निजवृत्त सारी.
मिळवुनि तें चिताभस्म आधींच तें लिंग पूजित सर्वोपचारीं,
आपणा आवडे गंध फुल नैवेद्य वस्तुमात्रीं पूजी मन्मथारी. ॥ १ ॥
यापरी सपत्नीक चंड शिव पूजितां सुखरूपेंचि कितेक दिवस गेले,
तंव चिताभस्म तें कोणी एके दिनीं लेशही भाजनीं न देखिलें;
तंव उठोनि चालिला बहू अटवी हिंडला तंव तें मिळेच ना कांहीं केलें,
शिणुनी आला घरा आपुली सुंदरा चंड पाचारुनी तिसी बोले. ॥ २ ॥

पद—( राग—कानडा ).

'शिवपूजेविण काय जिणें वो ॥ ध्रु० ॥ हिंडलों शिणलों आजिचे दिनीं. चिताभस्मेविण शिवपूजा नाहीं. ॥ १ ॥ सद्गुरुवचनें सर्वार्थदायक उल्लंघुनि मी लाजिरा व्यर्थ देहीं. ॥ २ ॥ पूजे अंतराई, पूर्ण माझे प्राण देईन शिवरामनाथपायीं. ' ॥ ३ ॥

ऐकोनि ऐसें शबरांगना वदे,
' स्वामी असे एक उपाय सावधें. ।
जाळूनि हें गेह रिघेन मंदिरीं,
तें घ्या चिताभस्म पुजा करा बरी. ' ॥ १ ॥

शबर म्हणत ' कांते, ऐक माझ्या गिरेसी,
मनुजशरिर देतें या चहूं साधनांसी ।
तरुणपण न वेंचीं, पल्लवी ते शरीरीं,
सुखमय तनु कैशी टाकिशी सांग गौरी ? ॥ २ ॥

अद्यापि तों तूज अपत्य नाहीं,
न भोगिलें त्वां विषयासि कांहीं; ।
भोगासि हें योग्य शरीर पाहीं,
तूं केविं जाळूं पहासी विपायीं ? ' ॥ ३ ॥

पद.

ऐकोनि शबरी 'बोलं स्वामी येविषयीं आळस काय ? । हेंच जिण्याचें सार्थक शिवपर वेंचत हा निजकाय. ॥ १ ॥ जन्मोजन्म माझें काय सुकृत कीं व्रत जप नकळे हेत । दान दिलें कीं पुजिला शिव मी देतें देतें तनु गिरीशार्थ. ॥ २ ॥ धण्या अनुमान झणीं न करीं येथें । देह परोपकृत्यासी खपत तरी तुष्टत देव बहुत. ॥ ध्रु० ॥ कीं माझ्या जननी जनकाचें न कळे साधन आजी । शिवरामास्तव जाळिन पूर्णसुखें तनु अनळामाजी. ' ॥ ३ ॥

शबरें ऐकोनि तिची युक्ती । देखोनि तिची अतिशयें भक्ती । बरें म्हणुनी निश्चितीं । संकल्प चित्तीं दृढ केला. ॥ १८ ॥ शबरी घेउनि

पतिआज्ञा । सुस्नात अलंकारिली जाणा । अग्नी लाविला तिनें भुवना । करी प्रदक्षिणा सद्भावें. ॥ १९ ॥ वंदूनि आधीं गुरुमूर्ती । ध्यायिला सदाशिव चित्तीं, । प्रवेशाभिमुखें निरुती । प्रार्थी शिवाप्रती कृतांजुळीं. ॥ २० ॥

पुष्पाणि संतु मम देव तवेंद्रियाणि धपोऽगुरुर्वपुरिदं हृदयं प्रदीपः ।
प्राणा हवींषिकरणानि नवाक्षतास्ते पूजाफलं नृजनु सांप्रतमीश जीवः॥४॥

वांछामि नाहमिह सर्वधनाधिपत्यं न स्वर्गभूतिमचलां न पदं विधातुः ।
भूयो भवामि यदि जन्मनि जन्मनि स्यात्वत्पादपंकजलसन्मकरंदभृंभः॥५॥

जन्मानि संतु मम देव शताधिकानि माजातु नमे विशतु चित्तमबोधहेतुं ।
किंचित्क्षणार्धमपि ते चरणारविंदं नापैतु मे हृदयमीश नमो नमस्ते. ॥६॥

पद.

'मदनदहन, श्रीदेवा ये गौरीशा, ॥ ध्रु० ॥ माझीं करणें सुमनें तुझी तनु अगुरूचा धूप जाळूं, । तव नैवेद्य प्राण सकळ हा हृदयाचा दीप ओवाळूं. ॥ १ ॥ अंतःकरणाचें पंचकही नवाक्षता ह्या तुजलागीं, । तुझ्या पूजेचें फळ पावो जिव हा माझा शिवयोगी. ॥ २ ॥ नलगे, मज हे संपत्ती नलगे, स्वर्गविधिपद मजलागीं, । जन्मोजन्मीं सतत होइन तुझे पदांबुजीं भृंगी. ॥ ३ ॥ या हेतु मज हो कां भवशत तुझी नावरू मज माया, । माझें हृदय विसंबुनि घडिभरि नव जावें त्वां शिवराया ! ॥ ४ ॥ तेजोमया तूं स्वयंप्रकाशक अग्निरूपा तुजमाझारीं । शिवरामा तनु पडतां पूर्ण कैंचें भय मज संसारीं ? ॥ ५ ॥

यापरी शबरी हृत्कमळीं । तुष्टवुनियां शशिमौळी, । तत्काळ ज्वाळांमाजि पडिली । भस्म झाली तेचि क्षणीं. ॥ २१ ॥ तो शबर स्वानंदें आपण । यममंत्रें तें भस्म घेऊन, । त्या गृहाजवळी शिवपूजन । सांग संपूर्ण संपादी. ॥ २२ ॥ स्वानंदें शिव पूजितां पाहीं, । बाह्यस्फूर्ती नावडे कांहीं; । पुष्पांजुळी देते समयीं । पत्नी प्रत्यक्षीं उभी ठाके. ॥ २३ ॥ ते दिशीं शिवप्रसादार्थ । पत्नी स्मरोनि डावें पाहत, । तों ते उभी आहे

तेथ । पूर्ववत निजांगें. ॥ २४ ॥ पूर्ववत् देखतां पत्नीस । वाहिलें दिसे भस्मावशेष, । यथापूर्व देखतां गृहास । शबर मानसीं ठकावला. ॥ २५ ॥ अग्नि जाळितु तेजें जाण । सूर्य जाळित रश्मीनें, । राजा प्रज्वळी दंडानें । ब्राह्मण मनें प्रदीत. ॥ २६ ॥ 'अवो प्रिये तूं हुतांशीं । निःशेष जळोनि गेलीसी, । त्या चिताभस्में म्यां शिवासी । स्वानंदेसीं पूजिलें. ॥ २७ ॥ अग्नीमाजी जळाला, । तो तुझा देह कैसा आला ? । विस्मय वाटे वो जिवाला, । वृत्तांत मजला हा सांगें. ॥ २८ ॥

पद. ( राग--भैरवी. )

'काय सांगों आश्चर्य माझें मोठें, । करुणा शिवजीची धण्या मज नवलाव वाटे ॥ ध्रु० ॥ वराहि जाळुनि आंत रिघालें ऐके । मग मी माझें शरीर, अग्नि कांहीं न देखे. ॥ १ ॥ अग्नी आंत बाहेर मजला पाहतां । मृत्युंजयावांचुनि न दिसे आतौता. ॥ २ ॥ जैसें अमृतीं पडतां दैवगती । तापलेंसे मज नाहीं झाली तेथील गती. ॥ ३ ॥ निजेलें जैसें जागोन येतें, । तैशी सुखसिंधूहूनि आलें मीं येथें. ॥ ४ ॥ तव घरही देखिलें पूर्वापरी । पूर्ण शिवरामप्रसाद लाधलें झडकरी. ॥ ५ ॥

परस्परें बोलतां यापरी, । विमान उतरलें त्यां पुढारीं; । शिवभक्त गर्जती जयजयकारीं । दोघे अंतरीं ठकावलीं. ॥ २९ ॥ ते कोटि-चंद्रांहुनी भासुर । घेऊनि आले शिवकिंकर, । दोघां दंपतीचे धरूनि कर । विमानीं सत्वर बैसविती. ॥ ३० ॥ शिवभक्तांच्या हस्तस्पर्शें । दोघें झालीं स्वयंप्रकाश, । विमान जातां सावकाश । शिवसामरस्यें नांदती. ॥ ३१ ॥ यापरी तें शबरदंपती । पाहतां नीचयोनीं वसती । तेहीं श्रद्धेनें पूजोनि पशुपति, । शिवसद्गती पावले. ॥ ३२ ॥ सकळ कर्माचें निजधाम । ऐसा तो कासया जन्म ? । ज्याचें हृदयीं पूर्णकाम । जडला पूर्ण उत्साहें. ॥ ३३ ॥ विचारेंसीं विद्या सकळ । अगत्य नसेचि अळुमाळ । एक हृदयीं राहिला चंद्रभाळ । सर्वकाळ समरूप. ॥ ३४ ॥ जेथें स्थिरावलें शिवभजन । त्याहुनि आन नाहीं धन्य, । यालागीं जन्मा येऊन । सांबचरण सेवावे. ॥ ३५ ॥ हे कथा अत्यंत सुंदर । येथें श्रद्धेचा बडिवार, । परिसतां भक्तितत्पर । श्रद्धा अपार मग्न वाढे. ॥३६॥

श्रद्धेच्या योगें उत्कट । पाविजे पूर्णानंदपीठ । मग निस्तरिजे भवसंकट । ऐशी उद्भट शिवभक्ती. ॥ ३७ ॥ श्रोतीं व्हावें सावधान, । हें ब्रह्मोत्तरखंडीं पुराण; । अखंड वक्ता नारायण, । निरूपण अवधारा. ॥ ३८ ॥ शिवरामाकरवीं ग्रंथ करी, । कर्ता आपणस्वयें गोसावी; । पूर्ण शिवसुखाचिये गांवीं । ऐक्यें भोगवी शिवसुखा." ॥ ३९ ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे श्रद्धाभक्तिवर्णनं नाम शबरीआख्यानसप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

॥ श्री सांबाय नमः ॥

सूत म्हणे "अवधारा, । सर्वधर्मांचिया सागरा । व्रत आहे उमामहेश्वरा । अर्चित्या नरा सिद्धिदातें. ॥ १ ॥ आर्यावर्तदेशसंभूत । कोणी ब्राह्मण देवरथ, । कलत्रपुत्रीं युक्त, । विद्वान समर्थ उत्तमवंशी. ॥ २ ॥ वर्ततां यापरी । एक कन्या झाली त्याचिये घरीं, । शारदा नाम अतिसुंदरी । लक्षणीं समग्रीं लक्षितु. ॥ ३ ॥ ते बारा वर्षांची झाली, । तों पद्मनाभनामकें घेतली । त्याची भार्या होती मेली, । कन्या नेमली देवरथें. ॥ ४ ॥ तो पद्मनाभ महाधनी, । शांत सदाचारगुणी; । तेणें कन्याविवाह करुनी । त्यासि निजनंदिनी दीधली. ॥ ५ ॥ माध्यान्हीं विवाह झाला । तो श्वशुरगृहीं प्रवेशला । तंव सायंकाळींच्या संध्येला । नदीस चालिला पद्मनाभू. ॥ ६ ॥ विधिवत् संध्या सारिता जाण । तों केवळ झाला अस्तमान, । मार्गीं सर्पें करितां दंशन । पावला मरण निजकर्में. ॥ ७ ॥ विवाह जालियानंतर । बांधवीं शोक केला थोर; । त्याची सासू आणि श्वशुर । दुःखें अपार शीणलीं. ॥ ८ ॥ बंधुजनां आज्ञा देऊन । स्वगृहा गेले अवघे जण, । वैधव्यें शारदा आपण । राहिली अनुदिन पितृगृहीं, ॥ ९ ॥ मृतत्व पावला भ्रतार । रहित ते शारदा सुंदर, । पितृगृहीं कितेक वासर, । कंठी

निर्धारें निजधैर्यें. ॥ १० ॥ तंव कोणे एके वेळेसी, । नैध्रुव मुनी आला गृहासी, । तो आंधळा अतिवृद्ध वयेंसी । एकें शिष्येंसीं समवेत. ॥ ११ ॥ ते वेळीं घरीं नव्हतें कोणी । घरा येतां नैध्रुव मुनी, । माझें दैवताचि असे ह्मणुनी । वंदी सुमती ते बाळा. ॥ १२ ॥

पद. ( राग–काफी ).

'यावें जी महाराज सुखासनीं येउनि बैसावें, । नमो नमोजी काये अपेक्षित तें मजला सांगावें. ॥ १ ॥ संत पूजितां संतुष्ट महादेवो । स्पर्शन, दर्शन, संभाषणीं निरसे सर्वहि मोहो, ॥ ध्रु० ॥ भावें बोलोनि चरण क्षाळुनि व्यंजनें शीतळ केला, । पाटीं बैसवुनि न्हाणुनि देवपूजे तो बैसविलाहो. ॥ २ ॥ दैवतपूजा झाल्यावरी पृथगासनीं बैसवुनि त्यासी, । गंध फुलें धूप दीप अर्चुनि भुंजवि सुरतान्नासी. ॥ ३ ॥ नवविधरस अमृतान्नें जेवुनि नैध्रुवमुनि तो धालाहो । तुष्टोनि अंतरीं प्रेमें आशीर्वादहि देता झाला हो. ॥ ४ ॥ 'प्रीतिसीं विहरता प्रसवुनि सुत कीर्तिहि लाहुनि देहीं' । शिवराम प्रभु पूर्णानंदें प्रसादयोग्यहि होई. ॥ ५ ॥

तो ज्ञानचक्षू वदला कृपेनीं,
त्याची परीसोनिहि प्रीतिवाणी; ।
चित्तीं बहू पावुनि विस्मयातें,
कृतांजुळी बोलत शारदा ते. ॥ १ ॥

देवा, वाक्य तुझें मृषापण नव्हे, मीं मंदभाग्यें स्वयें,
दुष्कर्मे विधवा तवामृतगिरे मी योग्य कीं जालियें;'
तो बोले मुनि 'नोळखोनि वदलों तैसेंचि देवो करी,
श्रेयोवृद्धि उमामहेश्वरव्रता तूं सादरें आचरीं.' ॥ २ ॥

शारदा म्हणत 'तें व्रत आतां,
आचरेन जरि दुर्लभ हिता; ।
सांगिजे मज विधान व्रताचें,'
बोलते मुनिस मंजुळवाचे. ॥ ३ ॥

'चैत्रीं मार्गीं सद्दिनीं भक्तिवोजें,
गुर्वाज्ञेनें हा व्रतारंभ कीजे; ।
संकल्पावें चौदशी अष्टमीसी,
दों पर्वांसी साधिजे आन्हिकासी. ॥ ४ ॥

प्रातःस्नान करूनि देवपितरां संतर्पुनीयां घरा,
येऊनी रचुनी सुमंडप तया शृंगार कीजे बरा;
नानापल्लव पुष्पतोरणफळीं घोषीं अलंकारुनी,
त्यामाझारिंच पंचवर्णकमळा निर्धारिजे पाहुनी. ॥ ५ ॥

त्रेचाळीस दळीं विराजित बहिर्द्वारीं तयाभीतरीं,
ऐसें पंकज पंचवर्ण रचुनी चौकोनि त्याअंतरीं,
रेखाटूनि तयांत वर्तुळ पुन्हा रेखाटिजे यापरी,
.................................॥ ६ ॥

तेंवीं तंदुलव्रीहिराशि रचवीं तन्मध्यकूर्चावरी,
धान्यीं पूजित कुंभ त्यावरि घडी स्वर्णांबराची बरी;
गौरीशंकररूप दोनि प्रतिमा तेथें बऱ्या स्थापुनी,
त्या पंचामृतयुक्त शुद्ध जिवनीं प्रक्षाळिजे भाजनीं. ॥ ७ ॥

रुद्रैकादशकें षडक्षरशतें अष्टोत्तरें मंत्रुनी,
पीठीं स्थापुनि त्या पुन्हां अपणही शुक्लांबरा नेसुनी,
पैं सिंहासनिं बैसुनी शिवउमापीठासही मंत्रुनी,
प्राणायाम करूनि तेथ करणें संकल्प ऐसा मनीं. ॥ ८ ॥

जीं जीं पावें जन्मजन्मांतरींचीं,
तीं नासाया मूर्ति पूजूं शिवाची; ।
सौभाग्यैश्वर्यादि मोक्षाभिवृद्धी,
लाहूनियां शंभु पूजीत आधीं. ॥ ९ ॥

संकल्प करूनि यापरी, । अंगन्यास कीजे अंतरीं; । मग उमा आणि त्रिपुरारी । ध्यावें अंतरीं मेहुण. ॥ १३ ॥

## पद---( असावरी ).

कुंदेंदुधवल, सर्पाभरण भूषणांबर, घेत फरश मृग दिव्यहस्तां । रवि-कोटिकांति जगदानंदकारणा; । जान्हवीधर भक्तजनहृदिस्था ! ॥ १ ॥ माये देखिला त्यां मनमंदिरीं वो । आपपर भास परमार्थता नाढळे, दाटला शिव आंतबाहिरि वो. ॥ ध्रु० ॥ फणिफणावृत जटाजूट सीतांशुधर कोटि, रत्नांगदाभिरामा । भाळशिखीं नेत्र रविचंद्र नयनांबुजीं नीळगरळ विराजित दुर्धर्ष कामा. ॥ २ ॥ हस्तिकृत्यावरण, अस्तिमाळाभरण रत्नसिंहासनारूढमूर्ते, । पूर्णानंद वृंदारकवृंदसुखदायका, । शिवराम पुण्यकीर्ती. ॥ ३ ॥

## असावरी.

देवि दिव्यावयवशालिनी । रविभापराभवितनिजवाळवेषा ।

बाळशशिशेखरा पाशअंकुशधरा वेदशिखरा परब्रह्मयोषा. ॥

## पद.

पहा [माय माझीच कुळदेवता हे । गुरुकृपादीप प्रज्वाळुनी आरतें पाहतां मन तदाकार होये ॥ ध्रु० ॥ अभयवर हस्तकीं मणिमुगुट मस्तकीं, । कुरवकाशोकपुन्नागकुसुमीं । कृतशिरोभूषणा निजप्रसन्नानना । समसमान स्वयें सुसमविषमीं. ॥ २ ॥ फुल्लघनमल्लिकोत्कलितनीलालकांची कलापपर्यस्तजवना । औदार्यशालिनी खुणखुणीत किंकिणी रुणझुणीत नूपुराकीर्णचरणा. ॥ ३ ॥ बिंबाधरांशुविभ्राजमानद्विजा चंडकरकुंडलस्फारकर्णा । नवरत्नरुचिरनिजकंकणांगदमुद्रिकाभिरामा जय जय अपर्णा. ॥ ४ ॥ पीनकुचयुग्म मुक्तामया पदकहारभारएकावळी मुक्तनासा, । पूर्ण शिवरामवरदायिनी योगिनी झळकते प्रकट चैतन्यभासा. ॥ ५ ॥

यापरी जगज्जनक । हृदयीं चिंतुनि साधकें । तदात्मक मंत्र मानसिकें । जपुनि विवेकें अर्चावें. ॥ १४ ॥ त्या मूर्तीचें आवाहन । बाह्य प्रतिमेमाजी करून, । आसनार्घ्यादि विधान । करावें पूजन मूळमंत्रें. ॥ १५ ॥ नमो नमो पार्वतीकांता, । नमः त्रैलोक्यवरदाता । अर्घ्य माझा घ्यावा आतां । त्रैलोक्यनाथा त्र्यंबका ! ॥ १६ ॥ नमो देवि वो भवानी ।

भाविकभक्त भयहारिणी । अंबे माझा अर्घ्य घेउनी । मज कृपेनें तारावें. ॥ १७ ॥ ऐसें उच्चारूनि त्रिवारें । दोघां अर्घ्य द्यावें सादरें । गंधाक्षतादि पुष्पहार । आणि उपहार, धूप, दीप. ॥ १८ ॥ या उपचारें पूजन । मूळमंत्र अष्टोत्तरहवन । करूनि पुन्हा नीरांजन । देवालागुन करावें. ॥ १९ ॥ पुष्पांजुळी नमस्कार । करूनि सर्वहि उपचार । मग भुंजाविजे सादर । यापरी निरंतर पूजावें. ॥ २० ॥ एवं सायंतनीं पूजन । आचार्यानुमतें करून । जेवावें क्षीर हविष्यान्न । प्रसाद जाण जो शिवाचा. ॥ २१ ॥ ऐसें उभयपक्षीं निश्चित । वर्ष वर्ष करावें व्रत । झालिया व्रत समाप्त । उद्यापन तेथें करावें. ॥ २२ ॥ शतरुद्रांच्या जपमेळीं । प्रतिमा अभिषिंचाव्या जळीं; । आगमोक्तमंत्र प्रेममेळीं । उमाशशिमौळी पूजावीं. ॥ २३ ॥ वस्त्रेंसहित सुवर्णकलशीं । प्रतिमा द्याव्या आचार्यासी । मग भुंजवावें ब्रह्मणांसी । यथोक्तेंसी पूजोनी. ॥ २४ ॥ गो, हिरण्यांबर दक्षिणा । अर्पूनि तोषवुनी ब्राह्मणा, । त्याची मग घेऊनि ते आज्ञा । पूजाविधाना संपविजे. ॥ २५ ॥ ऐसें हें व्रत जो करी, । तो एकविस कुळांतें उद्धरी । सकळ भोग भोगुनी भारी । लोकांतरीं नांदतो. ॥ २६ ॥ मग रमे स्वर्गीं जाउनी । त्याउपर वैकुंठठिकाणीं, । तया उपरी शिवभुवनीं । शिवचि होउनी नांदे तो. ॥ २७ ॥ हें महाव्रत हो बाळे, । तूंही आचरिजे भावबळें, । दुर्लभ, मनोरथ तेचि वेळे । तूं तत्काळें लहासी. ॥ २८ ॥

पद—(घाटी भाविक मोठा हो).

ऐकूनि ऐशी ते मुनिवाणी । तद्वचनीं विश्वासुनियां । संतोषोनियां । शारदा ते अंगिकारी मानुनियां । तों आलीं जननीजनकें सदना आपुल्या ठाकूनियां । ते अवलोकुनी वदले मुनीचे पदसरसीरुह वंदुनियां. ॥ १ ॥ 'धन्य महापुरुषा, हें तुझें दर्शन आम्हां घडलें गा । तारिं तारिं भवपतितां आम्हां दूरि निवारुनि भवसंगा ॥ ध्रु० ॥ तुझ्या आगमनें कुळ अमुचें पवित्र झालें गुरुराया, । परि हे बाळा विधवा झाली कर्मबळें अमुची तनया; । हे तुजला आली शरण तनुमनें विसंबुनियां । तव सन्निधीं हीकरीं व्रत करवुनी तारीं दुःखांबुधिपासुनियां. ॥ २ ॥ जोंवरी हें व्रत

समाप्ति पावे जी येथें, । आम्हां शरणागतां स्वजनांला पाववि तरणोपायातें. । जन्मांतरिंचें फळलें भाग्य गोचर जाहलासी आमुतें । शिवरामप्रभु पूर्णानंदा करीं करुणा प्रगटें त्वरितें.' ॥ ३ ॥

यापरी प्रार्थिला मुनी । सर्वहि त्या भक्तजनीं; । 'बरें' म्हणोनि त्याचें भुवनीं । स्वस्थमनीं राहिला. ॥ २९ ॥ ते शारदा हीं वचनें, । विश्वासें घेउनी आपण । करी गौरीहराचें अर्चन । व्रताचरणविधीनें. ॥ ३० ॥ परमपावन हे कथा, । सावधान व्हावें श्रोतां, । पुढें शारदा आचरोनि व्रता । मनोरथा पावेल. ॥ ३१ ॥ लक्ष्मीनारायणा शरण, । आत्मा पूर्णानंदघन, । शिवरामनाथ आपण । निरोपण चालवी. ॥ ३२ ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

## आरति ( धाटी जैं कैलासवा० ).

जय देव जय देव दयानिधी त्रिशूळायुधीं । षड्रिपू वधीं धांवोनि आधीं । प्रगटावें हृदयामधीं. ॥ ध्रु० ॥ स्वानुभवें उमामहेशव्रत तुजलागीं । आरंभिलेंसे सहजें । योग याग जप त्यजिले अन्यक जे । तुझ्या प्राप्तीची इच्छा आहे मज । फार पूजन हें घेंई. ॥ १ ॥ अक्रियेचें तुज मौन जपे मन फार रिझे, । चिंतनेंविण ध्यान सांचिना दुजें । या व्रतें तोषावें महाराजें. ॥ २ ॥ साधन आणि साध्य सारुनियां सर्व । साधुनि सत्संग योगपर्व । पूर्णानंद पूर्ण गाळुनि गुणवर्म । शिवराम आराधी सांब शर्व. ॥ ३ ॥

## ललित.

अद्वय उमामहेश्वर । व्रत मांडिलें हें सार. ॥ १ ॥
आम्ही व्रतधारी । अक्रिय सर्वापरी. ॥ ध्रु० ॥
करितां पूजेचा आरंभू । करणें झाला स्वयें शंभू. ॥ २ ॥
पूर्ण शिवरामनिष्टेचें । घडलें आतां फिरणें कैचें ? ॥ ३ ॥

॥ श्रीसांबाय नमः ॥

यापरी ते शारदा बाळा । गुरुसन्निधी कीरतां व्रताला, । नियमीं भाव जडोनि गेला । तंव हो आला वत्सर. ॥ १ ॥ संवत्सरांत सुंदरी । उद्यापन करी पितृमंदिरीं, । ब्राह्मण भुंजविले सर्वोपचारीं । दक्षिणा भूरी दिधल्या. ॥ २ ॥ मायबापांच्या अनुमतें । विसर्जिलें ब्राह्मणांतें । ते दिनीं करी उपोषणातें । शिवजप तेथें सारिला, ॥ ३ ॥ स्वगृहाजवळी गुरुमठीं । प्रदोषीं पूजोनि धूर्जटी । जपार्चनेसीं ते गोरटी । हृत्संपुटीं शिव ध्याये. ॥४॥ त्या रात्रीं तिचे सन्निधानीं । जाग्रण करूनि नैध्रुव मुनीं । जपध्यानीं शिवसंनिधानीं । श्रीभवानी तोषविली. ॥ ५ ॥ देखोनि तिच्या भक्तिभावासी । त्या मुनीच्या तुष्टोनि योगासी, । जगदंबा तेजोराशी । तेचि घडीसी प्रगटली. ॥ ६ ॥

जगन्मयी ते जगदंबिका शिवा,
प्रत्यक्ष झाली हारिखोनि तेधवां; ।
अंध स्वयें नैध्रुव तो सुखावला
स्फुरत्प्रभालोचन दिव्य लाधला. ॥ १ ॥

जगज्जननि सन्मुखीं प्रगटली विलोकूनियां,
सवेंचि पदपंकजा नमित शारदा योगिया;
पदींच मुरकुंडली निजसुखें जिवीं दाटली.
मुनीस मग भेटुनी मग शिवा तया बोलिली. ॥ २ ॥

' मुनीश्वरा, मत्प्रिय शारदे मुली,
म्यां दाविली मूर्ति तुम्हांस आपुली; ।
मी तुष्टलें हो, वरदान मागणें,
देईन देवांसि अलभ्य तें मुने.' ॥ ३ ॥

मुनी बोले ' माते, मृतपतिच हे विप्रतनया,
इच्या पूजे गेलों भुलुनि बहु भावेंकरुनियां;
पतीपुत्रीं नांदें म्हणुनि वदलों दृष्टि नसतां,
खरें माझें आशीर्वचन करिं वो माउलि अतां. ॥ ४ ॥

## पद—( धाटी—भाविक मोठा हो ).

माता बोले 'हे तव पूर्वी द्राविडाची कांता, । भामिनि नामें दुसरें एक इच्या निजवृत्तांता रे. । तिशीं भुलोनि कदा तो न वचे ज्येष्ठप्रति सर्वथा र. ॥ १ ॥ ऐशी गतजन्मींची गत इची पाहीं रे, । आतां मद्भजनें पावेल सुख सर्वहि रे. ॥ ध्रु० ॥ पतिवियोगें अनपत्य ते शोकें विलया गेली । शेजे वरिंच्या द्विजें देखुनी एकाकी हे धरिली रे; । इनें झडकुनी देतां त्याच्या अंतरीं हे जडली रे, । निशिदिनिं चित्तीं चिंतित इसी मेला तो अवकाळीं रे. ॥ २ ॥ ज्येष्ठवरुनी फिरवितां पती ये भवीं झाली विधवा । यास्तव विघडिती स्त्रीपुरुषां त्या पावति शिशुवैधव्या रे, । पूर्वी हे मद्भजनें तोचि निस्तरली अघगोवा रे; । तो विरहातुर द्विज उद्वाहुनि गेला गेला अंतकगोवा रे. ॥ ३ ॥ प्राग्जन्मीं पति तो इचा पांड्यदेशीं जन्मलाहे, । तो विप्रोत्तम सश्रीसंपद्विभवेंसीं आहे, । भर्तारेंसीं हे स्वप्नीं संगम लाहे पाहीं रे. ॥ ४ ॥ स्वप्नपतीसीं निशिदिनिं रमतां काळें हे सुत प्रसवे रे, । त्या पुत्रासी तो द्विज स्वप्नीं पाहिल स्नेहें विभवें रे, । ईस्तव मी प्रगटले मज हे पूर्वी भजली भावें रे, । नांदेल हे शिवरामप्रभुच्या परिपूर्ण वैभवें रे.' ॥ ५ ॥

## सवाई.

यापरि बोलुनियां मुनिशीं मग माय म्हणे "वो ऐक वेल्हाळे,
स्वप्नगता पुरुषासि कदाचित् जागृतिसीं पाहशीं चिरकाळें.
तो तुज, त्यासि तुवां पाहतां खुण सद्य परस्पर होइल बाळे,
गोष्टिहि होईल तेथ तुम्हां सुत दे निज त्यासि तयेच सुवेळे. ॥ १ ॥

व्रतफळ अर्धहि त्यासि समर्पुनि त्या पुरुषा अनुकूळाचि राहीं,
तेथें तुम्हां मग दैहिक संग कदा न घडे जवळी असतांही;
तो सहजें खपला तरि अग्नि प्रवेशुनि मत्पद लाहीं;
पूर्ण स्वधर्म नये बुडवूं शिवरामपदासरसीं मग होईं. ॥ २ ॥

लोकां मनोरम तुला निजपुत्र होतो,
नांदोनि भाग्यअधिकें स्वपदासि येतो; ।

ऐसें वदोनि उभयांप्रति शैलबाळी,
देऊनि सर्वहि अभीष्ट अदृश्य झाली. ॥ ६ ॥

जे उमा करुणतरंगिणी । वर लाहोनि तीपासोनी । शारदा आनंदिली मनीं, । पूजी अनुदिनीं गुरूतें. ॥ ७ ॥ क्रमल्या ते यामिनी । पद्मनयनू नैध्रुव मुनी । पितरां एकांतीं नेउनी । कथिला कानीं वृत्तांत. ॥ ८ ॥ मग सर्वांसही पुसोन । शारदेसी आनंदवून । कृपावर्षाव वर्षून । गेला मुनी आश्रमा. ॥ ९ ॥ यापरी शारदा दिनदिनीं । पती भोगूं लागे स्वप्नीं । जागृतीपरीस अधिकाहुनी । पतीसी मिळोनी खेळत. ॥ १० ॥ गौरीवराच्या प्रसादें, । स्वप्नपतिरतिसंबंधें । गर्भ धरिती झाली बोधें; । तेणें आनंदे शारदा. ॥ ११ तें न कळे बहिर्मुखाला । ऐकोनि शारदेच्या गर्भाला । धुकुधुकु करिती तिला । म्हणती चांडाळा नासली ॥ १२ ॥ ज्यासी झालें होतें सर्पदंशन, । त्याच्या बांधवीं ऐकोन । व्यथा पावती गृहासी मिळोन; । अवघे जन तेथें आले. ॥ १३ ॥ नवरीचेही कुळवृद्धजन । धर्मशास्त्री पंडित मान्य । सभा केली अवघीं मिळोन, । तिलाही आणवून उभें केलें. ॥ १४ ॥ शारदा उभी अधोवदन । दुर्वचनीं निर्भर्त्सिती जन; । कोणी दूर होती तीस देखोन । कोपून बोलती. ॥ १५ ॥ दुःशीळे मूढे, जारिणी । काय केलें जन्मा येउनी? । कुळ कळंकिलें निपटुनी । दूर पापिणी दुर्भाग्ये. ॥ १६ ॥ यापरी ग्रामस्थ तियेसी । निर्भर्त्सिती शारदेसी । म्हणती 'काय करावें इसी । कोण्या निर्णयासी योजावें?' ॥ १७ ॥ त्यामाजी कोणी दयाहीन । म्हणती 'हे कुळद्रुयोन्मूलन । इचे कापावे नाक कान । शिरोवपनपूर्वकें. ॥ १८ ॥ घट फोडोनि इच्या नांवें । ग्रामाबाहेर घालावें, । ऐसें तिहीं जों करावें, । गर्जे अभिनव नभवाचा. ॥ १९ ॥

## पद.

'पाप इनें नाहीं केलें । कूळदूषण नसे झालें । व्रत इचे नाहीं भंगलें. । ॥ १ ॥ हे धन्य माता । आतां यापरी कोणी । म्हणती हे जारिणी । जिभ त्यांची जाय चिरोनी. ॥ २ ॥ जननीजनकादिक स्वजनीं । या नभवाणीसी ऐकोनी । मग ते सर्वहि आनंदले मनीं. ॥ ३ ॥ तेथें कोणी अभक्तीं । कैंची मिथ्या वाणी म्हणती? । जिव्हा त्यांचीं शकलें हों सरती. पूर्ण प्रतीत हे ऐशी, । शिवरामप्रभावेंसीं । होतां ते म्हणती मानसीं. ॥ ५ ॥

ज्ञाती बांधव इष्ट गोत कुळिंचे जाणोनि तीची गती,
नेत्रीं बाष्प निरुद्धकंठ म्हणती हे धन्य धन्या सती;
कोणी तेथ कुलस्त्रिया स्वहृदयीं आलिंगुनी वानिती,
कोणी संशय घेत तेथ म्हणती हे केशि गर्भस्थिती ? ॥ ६ ॥

ऐशा संशयिल्यां जनां जरठ तो बोले तयां देखतां
'बा ही मायिक सृष्टि, काय पुसतां होणें न होणें अतां;
ईशाचें जग हें अघट्ट घटना माया कशी लाघवी ?
त्याची ते महिमा जनासि न कळे माया सुरां मोहवी. ॥ ७ ॥

## चामरी.

राजऋषी धूमकेत त्याचें शुक्र जळाआंत पडतां तें जळ पीत वेण्या गर्भ लाघली । विभांडिकाचें स्खलन पाण्यांत होतां जाण, । हरिणीनें तें पिऊन । ऋष्यशृंगा प्रसवली । सौराष्ट्राची ते मृगी नरें आतळतां पूर्ण सगर्भ तेथें विऊन । तापसातें मोकली । शिवराममाया मोठी आणि शफरीच्या पोटीं सत्यवती येतां भेटी, । कोण्या शास्त्रें वारिली. ॥ १ ॥ महिषी महिषासुरशुक्र रिचवितां शूर, । रोहिणींत बलवीर कोण्या गती जन्मला ? । देवऋषीशापें कीं बरें अयुक्तधर्म तोही युक्त होय संशयो नसेचि येथ बोलिला । शापें सांबगर्भी तें मुसळ आणि युवनाश्वगर्भही संतसेवनें महाव्रतें आणी गर्भिणी तरी रहस्यही पुसाइला. ॥ २ ॥

युवतिकरीं रहस्या पुसऊनी पहावो,
मग सकळ मनाचा संशयो सर्व जावो; ।
तंव मिळुनि स्त्रियांनीं पूसतां सर्व तीतें
सकळहि वदली ते सर्व वृत्तांत त्यांतें. ॥ ८ ॥

ऐकूनि मानुनि तिच्या वचनासि लोकीं,
निःसंशयें विचरती तिजसी विवेकी; ।
त्यानंतरें प्रसवली तंव ते कुमारा
तें बाळ दिव्य शरिरींच जिती तमारा. ॥ ९ ॥

## पद.

लक्षणयुक्त उदार भला । सर्वहि विद्या अभ्यासिला, । सद्गुरुरायें व्रतबंधही केला. ॥ १ ॥ त्या बाळकासी ॥ ध्रु० ॥ अष्टम नवम आणि दशमासीं । ऋग्यजुस्साम अभ्यासी । शारदेय म्हणती पुरवासी. ॥ २ ॥ पूर्णानंद गुरुपाय । निशिदिनीं भजतु निजदेहीं । शिवराम प्रभु न विसंबे ह्रदयीं. ॥ ३ ॥

तों काळें शिवपर्व तेथ जडला गोकर्णतीर्थाप्रती,
 तें जाणोनि दिगंतिंचे जनमुनी जाऊनियां मीळती;
माता तात किं आप्त आत्मजसवें ते शारदा चालली,
 संगें सर्व परिग्रही सहित त्यां क्षेत्रस्थळा पावली. ॥ १० ॥

तों स्वामी अवलोकिला परि दुरी, प्राग्जन्मिचा देखिला,
 प्रेमोत्फुल्लित रोम बाष्पनयनीं दृष्टींत तो रोंविला;
तोही स्वप्नसती सुलक्षणवती लक्ष्यीं स्मरूं लागला
 लक्षूनि स्वसुतासही हळुहळु तीसन्निधीं पातला. ॥ ११ ॥

'कांहीं मनोगत वदों तुजलागिं बाळे.'
 ऐसें वदोनि कडिये मग तीस नेलें; ।
प्रेमेंभरूनि सकळांसि सुखेंचि थोके
 एकांतिं बैसुनि तिला पुसतो विवेकें. ॥ १२ ॥

'तूं कोणाची कवण युवती देश तो कोण तूझा ?
 कोणाची स्त्री अणिकहि तुझें नामही सांग वोजा.'
हें ऐकोनी दुखित वदली ती वैधव्य हेतू,
 कोणाचा हा सुत गुणनिधी विप्र पुसे वृतांतु. ॥ १३ ॥

## सवाई.

'स्वामि' तुझा सुत हा अति सुंदर सर्वकलाब्धि सुविद्य असे,
शारदेय मग नामचि ऐकुनि विप्र पुन्हा तिस पूसतसे;
थोर तुझें नवलचरित्र करग्रहणींच पती निरसे,
केंवि तुला सुत यो विखिं कारण तें मज सांग कसें. ॥ १ ॥

यापरि त्या द्विजधाणिसि ऐकुनि फारचि लाजलि ते द्विजकांता,
नम्रमुखी धरुनी धिर बोलत 'परिहास ह्मणीं करिं आतां,
मी तुज जाणत तूं मज जाणसि येथें प्रमाण मन प्रियनाथा,
बोलुनि देवविरादिक पुत्रव्रतादिक पुण्य निवेदित आतां. ॥ ४ ॥

मग तो संतोषचित्तें । घेउनी तया पुत्रातें । शारदेयपितरांनुमतें । निजगृहातें चालिला. ॥ २० ॥ ते शारदाही आपण । त्यापाशीं राहिली बहुत दिन । काळांतरीं तो पावतां मरण । केलें सहगमन तयासीं. ॥२१॥ तीं मग दोघें होउनी दंपती । विमानीं बैसुनी निश्चिंतीं । दिव्य भोग भोगुनी अमिती । शिव सद्गती पावलीं. ॥ २२ ॥ हें सांगितलें आख्यान । श्रोता वक्ता मोक्षायतन । आयुःसंपद्वर्धनें । सौभाग्य संतानसुखदातें. ॥ २३ ॥ हें उमामहेश्वर व्रत । सर्व व्रतांचा नृपनाथ । भावें वाचित जे ऐकत । त्यांसीही हस्तगत । भोगमोक्ष. ॥ २४ ॥ सर्व व्रतांचें हें शिखर । महामोहाचें वारी आंधार । निजभावें आचरल्या सादर । शिवमंदिर पाववी. ॥ २५ ॥ लक्ष्मीनारायण कल्पतरू । कल्पनेसी नेदी अवसरू, । करूनि संकल्पविकल्पमारू । कथापडिभरु चालवी. ॥ २६ ॥ ब्रह्मोत्तरखंडींचें कथन । पूर्वोत्तरही आपण । कथा अखंड दंडायमान । नित्य नूतन प्रकाशी. ॥ २७ ॥ नेउनी शिवसभेमाझारीं । शिवराम केला अधिकारी । पोषवी शिवकथामृतधारीं । मृत्युमार चुकविला. ॥ २८ ॥ यालागीं बोलिजे मृत्युंजय । ग्रंथीं दाविलें निर्भय । म्हणौनि संत ते तन्मय । तेथील सोय ते जाणती." ॥ २९ ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे शारदेयआख्यानं नाम एकोनविंशतिऽध्यायः ॥

## आरति.

जय जय कैलासनायका, सुखदायका, भवतारका, मारमारका । जडजीवशिवकारका. ॥ ध्रु० ॥ आचारा अतीत आचरतां व्रतमनेंविण मनोरथा पुरवीसी । व्यवहार स्वप्नवत सर्वांसि विदित चिन्मय करूनि सत्य दाखविसी. ॥ १ ॥ आगंतुक जीवपरि भेद सर्पं देखिला सदा संपविसी, ।

मुळिंचा निजबोध वल्लभ अनवद्य देउनि सौभाग्य वाढविसी. ॥ २ ॥ भक्त-महावृत्ती देखुनियां चित्तस्वानंदसंपत्ती । पूर्ण देशी खंडोनियां मृति जन्माची संतती । शिवरामपदाप्रति त्यासी नेसी. ॥ ३ ॥

## ललित.

वळला कामांतक उदार । न दिसे कामाचा वावर. ॥ ध्रु० ॥ करितां अक्रियेचें व्रत । तुष्टोनियां उमाकांत; ॥ १ ॥ स्वप्नप्राय जो संसार, । येणें केलाचि सुखसार. ॥ २ ॥ पूर्ण शिवरामाचा स्वामी । कोंदाटला स्वरूपनामीं. ॥ ३ ॥

---

॥ श्रीसांबाय नमः ॥

## पद.

सद्गुरुपावलां जो कां शरण गेला, । तोचि शिवमार्ग पावला निर्धारें. ॥ ध्रु० ॥ जाळुनी बाह्यवेषा । त्याला विभूतिवेषा । हृदयीं धरिलें गौरीशा. ॥ १ ॥ रुद्राक्षांच्या ठायीं भरले रुद्राक्ष देहीं । शोभे, भवभय त्या नाहीं ॥ २ ॥ शिवभक्तांमाजि भिडला, । शिवपदांबुजीं जडला; । तोचि सिंहासन चढला. ॥३॥ शिव आठवतां डुलतो, । शिवसंप्राप्तीनें खुलतो; । शिवबोधें स्वानंदें भलतो.॥४॥ पूर्ण शिवरामावरी । जीवित्व कुरवंडी करी, । होईन त्याची मी कुमारी. ॥ ५ ॥

रुद्राक्षाच्या प्रभावा । न वर्णवे वेदां देवां, । तेथें येर जना काय केवा? । रुद्राक्षवैभव वर्णावया. ॥ १ ॥ त्यांत कांहींएक किंचित । सूत ऋषीश्वरां सांगत; । "रुद्राक्षाचें सामर्थ्य । श्रोते स्वस्थ अवधारा.॥२॥ ऐकतां रुद्राक्ष-माहात्म्य । पापताप होती भस्म, । त्याचे हृदयीं पूर्णकाम । प्रगटे परब्रह्म शिवमूर्ती. ॥ ३ ॥ सामर्थ्य रुद्राक्षधारणा । कासयाची देऊं तुळणा । महाव्रत तें हेंचि जाणा । बोलती नाना महर्षी. ॥ ४ ॥ जो धृतव्रत सधर । रुद्राक्षांसी धरी सहस्त्र; । त्यातें नमिती सर्वही सुर, । जैसा शंकर

तो तैसा. ॥ ५ ॥ अभाव झाल्या सहस्त्रांसी, । तरी सोळा सोळा दों बाहूंसीं; । एक असावा शिखेसीं, । द्वादश द्वादश मणिबंधीं. ॥ ६ ॥ कंठदेशीं बत्तीस गणित, । चाळीस संख्या मस्तकावृत; । द्वादशीं दोनी कर्ण भूषित, । अष्टोत्तर शत वक्षासी. ॥ ७ ॥ ऐसा जो भूषिला शरीरीं । तो पूजिजे शिवाचारी, । मुक्तपोवळीं हेम वैडुरीं । रौप्य काश्मिरीं मिश्रित. ॥ ८ ॥ येणेंसीं धरी जो रुद्राक्ष । तो शिवचि जाणिजे प्रत्यक्ष, । केवळ साक्षेपें रुद्राक्षी । त्यासी विरूपाक्षी न विसंबे. ॥ ९ ॥ रुद्राक्षधाऱ्या अघ ना वरी, । सूर्यासी जैसी शार्वरी, । माळेनें मंत्र जपला जरी । तरी कोटिवरी फळ देतु. ॥ १० ॥

## पद–( राग–परज ).

शंकर नाचताहे, । ऐशी रुद्राक्षीं हे महिमा पाहें. ॥ ध्रु० ॥ एकहि तो रुद्राक्ष त्रिपुंड्रहि ज्याच्या अंगीं नाहीं । जन्म तयाचा व्यर्थचि, । तो नर पाहीं । केवळ पशू दों पायीं. ॥ १ ॥ एकचि रुद्राक्ष शीर्षीं धरुनी स्नान करी जो देही, । भागीरथीचें स्नान तया घडलें संशय नाहीं. ॥ २ ॥ जळाभिषेकेंविण रुद्राक्षा पूजी जो सद्भावें, । तो शिवलिंगपूजेचें फळ तें लाहुनि शिवपद पावे. ॥ ३ ॥ एकमुखी पंचानन एकादशमुखींचे ॥ चौदांचे ऐसे हे रुद्राक्ष शिवात्मक फळ हें धारणाचें. ॥ ४ ॥ नीचयोनी आणि दरिद्री नृप होती भरवसीं रे, । शिवरामप्रभु सांगे पूर्ण ऐका इतिहासा रे. ॥ ५ ॥

काश्मीर देशीं भद्रसेन । राजा होता महाबळवान, । त्यास एक पुत्र झाला जाण । सुधर्मा म्हणौन तेजस्वी. ॥ ११ ॥ तेथील एक प्रधानपुत्र । तारकनामा अतिपवित्र, । तो तयाचा झाला मित्र, । दोघां निरंतर सख्य बहू. ॥ १२ ॥ दोघांसी एक सख्यत्व, । दोघांच एक सम महत्व; । दोघांचेही अधिक सत्व । एक निजतत्व दोघांचें. ॥ १३ ॥

## पद—( राग–सारंग ).

दोघे गुरुसेवे बहु तत्पर भस्मरुद्राक्षविभूषा । शिवमय जाणुनि जग हें पाहती गाळुनि प्रकृतिपुरुषा. ॥ १ ॥ ते निज मित्र असे सजले, । जे क्षणभंगुर या विषयासी विटोन शिवा भजले. ॥ ध्रु० ॥ कुंडलहार,

कटिसूत्रविभूषण स्वर्णमय त्यजुनी, । रुद्राक्षांची कंकणमाळ गळां श्रवणाभरणीं. ॥ २ ॥ हेममहामणि रत्न जयांची अनावडि फार मणीं, । दोघे कदा रुद्राक्ष न टाकिती बोधियलेंहि जनीं. ॥ ३ ॥ पूर्ण सुखें शिवराम विलोकुनि काढुनि धी जे वनीं । आकळिजति ते शिव तत्पद अव्यय, साच जिणौनी अवनीं. ॥ ४ ॥

ऐसी असतां त्यांची चर्या । तेथें आला पराशर आचार्या; । देखतां सख झालें राया । गेला तया सामोरा. ॥ १४ ॥

साक्षात्पितामहचि मानुनि त्या मुनीसी
सारूनि पूजन तया बरवें विधीसीं,
जाणे त्रिकाळमुनि जाणुनि आदरेंसीं
राजा पुसे विनययुक्त पराशरासी. ॥ १ ॥

पद.

मत्सुत आणि मंत्रिसुत, । हेमरत्नांसि विरक्त । विभूति रुद्राक्षीं आसक्त किन्निमित्त ते झाले ? ॥ १ ॥ हेंचि सांगें मुनिराया विस्तारें. ॥ ध्रु० ॥ नका म्हणुनि शिक्षीजती, । कांहीं केल्या न टाकिती; । हे तों बोधियले नसती । येथें कोणीं कांहीं. ॥ २ ॥ पूर्ण प्रबोधिल्याविण । शिवरामाचें भषण । अंगीं ल्यावया कारण । काय आहे ययांसी ? ॥ ३ ॥

ऐसी यांची स्वभाववृत्ती । केविं जाईल सांगें मजप्रतीं, । ऐकोनि रायाची वदंती । बोले प्रीतीं पाराशरू. ॥ १५ ॥

चामरी.

'राया ऐकें तूं सावेव, । त्वत्सुताचा अभिप्राव । मंत्रीपुत्राचा स्वभाव । सांगेन मी सादर. । नंदिग्रामीं कोणी एक महानंदानामक । वेश्या तेथें ते नारक । पूर्वीं होती सुंदर । छत्रीं चामरीं अपार । वैभवेंसि साजे फार, । स्वर्णयानीं निरंतर शोभे ते दिव्यांबरीं; । चंद्रापरि सुशीतळ, । शय्यापर्यंक सळाळ । गोधनाचा सर्वकाळ मेळा डुभे मंदिरीं. ॥ २ ॥

## सवाई.

कस्तुरि कुंकुम केशरिंचें अनुलेपन नित्य सदन्नच जेवी,
रत्नमयभरणें शरिरीं धरि दिव्य चिरें तशि, कुंकुम लावी;
दिव्यांबर, उपरि धन संपति, सर्व शिवार्थचि सांचुनि ठेवी,
शिवपूजनतत्पर सद्व्रत शिवकीर्तन नामरसायन सेवी. ॥ १ ॥

## असावरि.

नित्य शिवभक्तजनभक्तिसुखतत्पर नित्य नूतन घरीं वर्ततां ते,
कोणि एके दिनीं नित्यशाळेमधिं नाचवी कुक्कटा, मर्कटातें;
त्यांसि रुद्राक्षमय भूषणें लेवउनी थैकथैक ताळ तोडित हातें,
हासतां हासवी सखिया विनोदवि खेळवी नाचवी नित्य सहजीं सुखार्थें.॥१॥

होऊनि वैश्य शिव तो तिचिया घराला,
त्या कौतुकार्थ मग ठाकुनि तेथ आला; ।
रुद्राक्षभूषण त्रिपुंड्र ललाटपट्टीं,
तें दिव्य कंकण करीं विलसे प्रकोष्टीं. ॥ २ ॥

महा राजकांती झळाळीत साजे,
जया देखतां ते रविदीप्ति लाजे. ।
तयालागिं हर्षें तिनें पूजियेलें,
करीं कंकणातें विलोकूनि बोले. ॥ ३ ॥

'कीं रत्नकांतिमय कंकण दिव्य हें जें,
चिंता हरि पण अम्हां अबळांसि साजे;' ।
ते कंकणस्पृह अशी गिर ऐकुनीयां,
तो वैश्य मग बोलत हांसुनीयां. ॥ ४ ॥

'या कंकणा त्वन्मन झोंबियेलें,
बरें तुला देइन जाण वाळें. ।
तूंची धरीं भूषण अंगदेशीं,
तूं मौल्य याचें मज काय देशी? ॥ ५ ॥

स्वैरिणी म्हणे "वैश्यनाथा। आम्ही नोहों कांहीं पतिव्रता; । आमुचा कुळधर्म, पाहतां । व्यभिचार सर्वथा चुकेना. ॥ १६ ॥ हें तुझें दिव्य करभूषण । मजलागीं देशी आपण, । तरी तीन दिस रात्रि दिन । पत्नी होईन मीं तुझी' ॥ १७ ॥ तो म्हणे 'प्रिये हें खरें कायी, । तरी हें कंकण देईन पाहीं; । रात्रिदिवस दिनत्रयीं । माझी होईं कुळवधू. ॥ १८ ॥ आमुच्या तुमच्या या व्यवहारीं । प्रमाण हा सूर्य निर्धारीं, । खरें म्हणोनि सुंदरी, । मज दयाकरीं आतळें. ॥ १९ ॥ वेश्या म्हणे 'ऐक निर्धारीं, । तीन दिन मी तुझी नारी; । होईन तुजसीं सहचारी' । म्हणोनि उरीं कर ठेवी. ॥ २० ॥ ऐसा करितां तिनें पण । दिलें हातींचें कंकण । रत्नमय लिंगही आपण । तिसी देउनी बोलतू. ॥ २१ ॥ 'हें रत्नमय लिंग वो स्वैरिणी । मज आवडे प्राणाहुनी; । हें रक्षावें त्वां बहुप्रयत्नीं । याचे हानीं मज मरण. ॥ २२ ॥ 'बरें' म्हणोनि ते वेळे । वेश्येनें तें लिंग घेतलें, । त्या मंडपतुळीस ठेविलें । आपण चाले गृहांत. ॥ २३ ॥ मग त्या विटधर्मा वेश्येसीं । एकासनें ते मिळाले निशीं । अरुवार पर्यंकशेजेसीं । रतिविलासीं निजेलीं. ॥ २४ ॥ तंव ते रति दिनमध्यरात्रीं । तों त्वरें मंडपाभीतरीं । अग्नी धडाडिला भारी, । मंडपापरिवारीं लागला. ॥ २५ ॥ मंडपा अग्नी झोंबला । एकाएकीं उठिली ते बाळा, । मर्कट सोडूनि दिधला । कुक्कुटाला मुक्त केलें. ॥ २६ ॥ स्तंभेसीं तें लिंग जळतां । दोघें देखती दूरता, । वैश्य वेश्येची दुःखावस्था । आवरितां नावरे.॥ २७ ॥

पद.

भवहर गेला वो । गेला मेला अग्नींत आहळला पडला घाला वो. ॥ ध्रु० ॥ जिवींचा जीवो लिंगदेहो, । त्याविण मी केवीं जीवों; । मरणचि थोर उपावो. ॥ १ ॥ मज तों कांहीं जिणें नाहीं वो । हव्यवाहीं पडोनि विदेही वो । शिवसुख लुटीन पाहीं वो. ॥ २ ॥ सिद्धचि तें करवीं येथ वो, । चिंतुनि चित्तें शिवमूर्तीतें प्रवेशेन अग्नीतें वो. ॥ ३ ॥ सुरवर यति मज वाराया वो । तरी शिवरायाविण माया नुरवीं काया वो. ॥ ४ ॥ शिवरामा स्तवन करीं विलंबें वो, । पूर्ण स्वयंभू तो शिवशंभू माझ्या हृदयीं बिंबे वो. ॥ ५ ॥

निर्धार त्याचा अवलोकुनि बरा,
दूतीं चिता ते रचवीत सुंदरा; ।

तों तेंथ वैश्यें करुनी प्रदक्षिणा,
 वंदोनि अग्नींत रिघे ततक्षणा. ॥ ६ ॥

संतापली देखुनि त्यासि योषिता,
 .......................................... ।
मी बोलिलें 'घेउनि याचि कंकणा,
 दिनत्रयें मी जहलें त्वदंगना. ॥ ७ ॥

पण मज करितां हो वैश्य मेला जिवेंसीं,
 म्हणउनि निजधर्में मी प्रवेशें चितेशीं; ।
त्यजुनि शरिर जेणें सत्य नाशोनि पावें,
 उरविन जरि सत्या, देव हातांसि पावे. ॥ ८ ॥

सत्याशयें धर्म अभग्न राहे,
 सत्याचिमाजीं जग सर्व आहे; ।
सत्यांत कैवल्यहि मोक्ष रावे,
 सत्येंचि ते सद्गति पूर्ण लाभे. ॥ ९ ॥

म्हणौनि हें सत्यचि आश्रयोनि,
 रिघेन अग्नींत पहा निदानीं; ।
निवारिली हो स्वजनीं प्रितीनें,
 निर्धारिला निश्चय हाचि तीणें. ॥ १० ॥

ते त्याचिया लोपभयें ततक्षणीं,
 त्यागावया प्राण जिवीं दृढाउनी, ।
भांडार लूटून समस्त भसुरां,
 चित्तांत चिंती निज पार्वतीश्वरा. ॥ ११ ॥

अग्नीस भावें करुनी प्रदक्षिणा,
 घाली उडी ते जंव धर्मअंगना; ।
स्वपादपद्मार्पित चित्त देखुनी,
 वारी स्वयें शंभु प्रसन्न होउनी. ॥ १२ ॥

सा तं विलोक्याखिलदेवदेवं त्रिलोचनं चंद्रकलावतंसं ।
शशांकसूर्यानलकोटिभासं स्तब्धेव भीतेव तथैव तस्थौ ॥ १ ॥

शंभु त्रिलोचन जटारजनीशधारी,
चंद्रार्क पावक सहस्त्र प्रभा शरीरीं; ।
तेजोमयांत सगळी मग ते बुडाली,
ते भीतभीत दचकोनि तटस्थ ठेली. ॥ १३ ॥

पद.

यापरी देखुनी गजबजली ते मनीं । तिला आश्वासुनी बोलत शूळपाणी ॥ १ ॥ 'धन्य तूं वेल्हाळे भजनाचे सोहळे । तुवांचि भोगियलें शिवपद ते तुज आलें. ॥ ध्रु० ॥ तुझी हे दृढभक्ति सत्यधर्मीं वृत्ती, । पहावया तुजप्रती । मीं आलों वैश्यवृत्ती. ॥ २ ॥ मायाग्नी उभविला, । तुज न्याया स्वपदाला । संसृतिमंडपाला । जाळियलें ये वेळा. ॥ ३ ॥ लिंगातें जाळुनि रिघालों मी अग्नीं, । तुझी निष्ठा पाहोनी । तुष्टलों करुणेनी ॥ ४ ॥ देवां दुर्लभ भोग, । देईन तुज मी सांग; । मागणें तें माग;' । अपेक्षित सांग. ॥ ५ ॥ ऐकुनियां बोला । पूर्ण सुखें ते बाळा, । शिवराम प्रभु झाला; । वर मागे स्वलीला. ॥ ६ ॥

भूमीं स्वर्गरसातळीं मज तयां भोगीं स्पृहा नावडे,
तूझें पादसरोज सेविन मला अत्यंत हें आवडे;
दासी भत्यहि दास बंधुजन हे त्वद्भक्तिचे वीकिले,
यांला त्वत्पदवीसि ने म्हणउनी वंदीतसें पाउलें.' ॥ १४ ॥

बरें म्हणुनि शंकरें सहित तीस सर्वांसही,
सर्वेचि स्वपदासि ने समरुपें प्रबोधान्वयीं;
मंडप जळे तईं फडकले कपी कोंबडें
मरोनि तुमचे कुशीं उभय येथ झाले पुढें. ॥ १५ ॥

तो मर्कट तुझा पुत्र, । कुक्कुट तो मंत्रिकुमर, । रुद्राक्षधारणेनें सधर, । कुळीं पवित्र जन्मलीं. ॥ २८ ॥ पूर्वाभ्याससंस्कारवशें । रुद्राक्ष भस्माचें

लागलें पिसें, । ये जन्मीं शिव पूजोनि सुरेश । शिवपदासी पावती. ॥२९॥ हें बाळांची प्रवृत्ती । आम्हीं सांगितली तुजप्रती । शिवभक्तीची ऐशी महती । ऐक मागुती शिवकथा. ॥ ३० ॥ हे कथा असाधारण । वक्ता लक्ष्मी नारायण । स्वयें शिवराम होऊन । निरोपण चालवितू." ॥ ३१ ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे रुद्राक्षमहिमावर्णनं नाम
विंशतितमोऽध्यायः ॥ २० ॥

---

॥ श्रीसांबाय नमः ॥

ऐसें ब्रह्मऋषीचें वचन । जें दुणावें अमृताहून । रायें संभ्रमें ऐकून । पुन्हा जापण बोलतू. ॥ १ ॥ "अहो हे संतांची संगती । समस्त पापा करी शांती । कामधेनूपरी संतती । सकळांप्रति दुभते कीं. ॥ २ ॥ आजि माझें नाशलें मायिक तम, । ज्ञान प्रकाशिलें निरुपम, । होतां तुमचा समागम । अमरोत्तम मी झालों. ॥ ३ ॥

पद—( राग—गौडी ).

या बाळाचें प्रभवींचें कौतुक कथिलें साचें । पुढील भविष्यहि मत्पुत्राचें आचरणही कर्माचें. ॥ १ ॥ देवा, सर्वहि मज सांग । माझा पुरवीं अनुराग ॥ ध्रु० ॥ आयुष्यहि किती वर्षें, संपत्ती याची कैशी ? । चित्‌शक्ती, कीर्ती कैशी हा धरी कवण्या श्रद्धेसी. ॥ २ ॥ मीं तंव असें शिष्य शरणागत, । भृत्य तुझा कामारी, । शिवरामा हे पूर्ण कशापरी तरती जीव संसारीं." ॥ ३ ॥

बोले पराशर "नृपा पुशिलें तुवां जें,
बोलावया पण नव्हे मज योग्य हो जें;
जें ऐकतां दुखवती जन आत याचे,
तूं पूसतोसि म्हणऊनि वदेन साचें. ॥ १ ॥

गेलें द्वादशवर्षे यासि निगुती आतां पुढें यावरी,
मृत्यू पावत सातवे दिवशिं हा मद्वैखरी हे खरी; ”
ऐसें काळकुटापरी वचन जें तें ऐकता अंतरीं,
राजा तो धरणीवरी उसळला मूर्छेन दुःसागरीं. ॥ २ ॥

मुनी पुन्हा त्याच नृपा कृपेनी
संबोखुनीयां उठऊनी पाणीं, ।
प्रेमें म्हणे “भीउं नको नृपाळा,
कल्याण आहे तुझिया सुताळा. ॥ ३ ॥

सृष्टीहुनी पूर्वीच एक निष्कळ,
स्वयें निरालोक अपार निश्चळ; ।
ज्योतिश्चिदानंदमय प्रकाश,
होवाच जो केवळ पार्वतीश. ॥ ४ ॥

पद.

तो शिव आपणातें राजस विधियोगें कल्पून । प्रेरुनि सृष्टीसी दिधले वेदहि तीलागून । पुनरपि निजतत्वसंग्रहानें उपनिषदां शोधून । रुद्राध्याय ब्रह्म्याला दिधला काढून. ॥ १ ॥ ऐसा दयाळ शिवराज । आपुल्या आपण विश्वा निर्मुनि निजसुखें करी प्रतिपाळ. ॥ ध्रु० ॥ तो रुद्राध्याय जयांत शिवतत्व विलसतसे । तेणें चहूं मुखीं विधीं वेद निर्मुनी हितार्थ । त्या दक्षिणदिशा आननीं उपनिषदमाथितार्थ । निवतां ऋषींसह सर्वदेव त्या रुद्रातें झेलित. ॥ २ ॥ पुत्रपौत्रेंसीं चालविला क्रमेंचि संप्रदाय, । तेणें पावले कितेक स्वपद रुद्राध्यायें; । पूर्ण श्रुतिसार जपतचि पहा मोक्षोपाय । जपतां शिवरामीं निर्दोष जन शिवसुख लाहे. ॥ ३ ॥

यापरी रुद्राध्यायाचें महिमान । विधीच्या दक्षिणमुखा भूषण, । वेदाचें झालिया निर्माण । पुन्हा पद्मासन जग निर्मी. ॥ ४ ॥ त्या गुणत्रयात्मक त्रियोनीं । देव तिर्यङ् मनुष्य म्हणुनी, । जग अवघें दाटलें भरुनी । अजें योनिसंकल्पें. ॥ ५ ॥ ते ते जन्मगुणान्वितें । निर्मी त्या त्या कर्मातें; । तैसें तैसिया लोकातें । सृजी फळातें भोगावया. ॥ ६ ॥

लोकसृष्टिप्रवाहालागीं, । मागुती स्वयें ब्रह्मयोगी । सृजी धर्माधर्म विभागीं । पृष्ठभागीं वक्षःस्थळीं. ॥ ७ ॥ धर्मासी जे अनुसरले । तिहीं पुण्य स्ववश केलें; । अधर्माच्या पाठीं लागले । ते मग भरले पापमार्गी. ॥ ८ ॥ पुण्यें-करूनि स्वर्गप्राप्ती, । पापबळें नरकीं वस्ती; । दोघांसि केले दोघे अधिपती । एक शचीपती यम दुजा. ॥ ९ ॥ काम, क्रोध, लोभ, जाण । दंभ, मद, देहाभिमान । हें अधर्माचें संतान । नरकाधीन पूर्ण हे सर्व. ॥ १० ॥ गुरुतल्पक, सुरापान । आणिक दासी वेश्यागमन; । हे कामाचे पुत्र जाण, । मुख्य प्रधान प्रसिद्ध. ॥ ११ ॥ क्रोधापासाव पितृवध, । आणिक झाला मातृवध, । ब्रह्महत्या ते केल्या प्रसिद्ध । ऐसी हे कर्मसंतती. ॥ १२ ॥ देवद्रव्य परद्रव्य । अपहार आणि स्वर्णस्तेय । करितांही नुपजे भय । ऐसे हे तनय लोभाचे. ॥ १३ ॥ हे चांडाळ पापमूर्ती । यमें पाचारुनी निश्चितीं । नरकवृद्धीसी अधिपती । करूनि हातीं दे मुद्रा. ॥ १४ ॥ ते यमाचे अनुमतीं । नवही जाणें पापमूर्ती । नरकातें पाळूं लागती । उप-पाप मृत्यु मिळोनी. ॥ १५ ॥ तंव कैवल्यसाधनोपाय । पृथ्वीस प्रगटला रुद्राध्याय; । तें देखतां नवांचा समुदाय । धाकुनी भयें पळाला. ॥ १६ ॥ ते उपपातकी यांसहित । यमापुढें डोई आदळित, । नवही जणें मिळोनि तेथ । विज्ञापित यमातें. ॥ १७ ॥ ‘ जय जय जी यमा जगजेठी, । आम्ही तुझे किंकर हे ख्याती मोठी; । आम्हां नरकवृद्धीसाठीं । श्रेष्ठ परिपाटी त्वां दीधली. ॥ १८ ॥ आतां त्या लोकांचे ठायीं । आमुचे न टिकवे पाहीं; । रुद्रजपाच्या प्रकाशदाहीं । पोळलों देहीं पळालों. ॥ १९ ॥ गांवोगांवीं नदीतटाकीं, । पुण्यालयदेवाभिषेकीं, । सर्व रुद्रजपावलोकीं, । कैसें त्या लोकीं रहावें ? ॥ २० ॥ प्रायश्चित्तांच्या सहस्रां । गणना नाहीं आम्हां असुरां; । रुद्राक्षाच्या होतां उच्चारा । एक अक्षरा न साहवे. ॥ २१ ॥ आम्ही लोकांचे घातक । महापातकियांमाजी मुख्य; । परी रुद्रजपें अत्यंत । प्राणांतिक विष आम्हां. ॥ २२ ॥ आम्हांसि दुर्विषय व्यसन; । रुद्रजपें गेलों आहळोन । तें आमुचें उपशमन । वेगें आपण करावें. ’ ॥ २३ ॥ यापरी पातकमेळा, । यमा विनवी तत्काळा । येउनी ब्रह्मयाजवळा । वृत्तांत समूळ सांगितला. ॥ २४ ॥

## पद.

रुद्रअक्षराध्यायीं झाले रुद्रचि देहीं, । पाहतां पातकी दिसत नाहीं.॥ १॥
आतां काय प्रयोजन माझें । न मिळे अमुचें कांहीं खाजें. ॥ ध्रु० ॥
पाप्यांवांचुनि नरक शून्यचि झाल देख,। कवणाचें व्हावें म्यां शासक. ॥२॥
देखोनि पूर्णाधिकारा । ध्या शिवरामवरा, । जाळोनि कामेंविण व्यापारा. ॥३॥

ऐशी यमें करितां ग्लानी, । ऐकोनि स्वयें स्वपद्मयोनी । रुद्रजपविधानालागुनी । उपाय मनीं चिंतिला. ॥ २९ ॥

अश्रद्धा दुर्मेधा सृजि विधि अविद्या निजकुशीं
तिया श्रद्धा मेधा रिपु भरविल्या सर्व मनसीं;
तईं कोणी रुद्राध्ययन न करी लोक ठकला,
विलोकूनी ऐसें यम मग मनीं स्वस्थ बसला. ॥ ५ ॥

## असावरी.

पूर्वजन्मार्जितें पातकें लोक हे येथ अल्पायुषी होती, । रुद्र जपस्या त्या नरा दुरोनि देखतां पापसमुदाय ते सर्व पळती; । पूर्ण आरोग्य ऐश्वर्य ते लाहती अतिदोषी निर्मळची होती, । विज्ञान आणि ज्ञान समूळें बळकाउनि शिवरामधामीं अखंड मिळती. ॥ १ ॥ म्हणत रुद्राध्ययनें शंभु अभिसिंचुनी त्या जळें स्नान जे भक्त करिती, । ते अहो अनुदिनीं पुत्रपौत्रादि त्या संपदा लाहुनी सुखसंतती । शतरुद्राभिषेकें शतायुष लाहुनी शिवपदा शीघ्र चढती; । म्हणुनि शिवराम नित्य चित्तांतरीं मन ठेवि कां शंभुवरती. ॥ २ ॥

रुद्रायुत स्नान सुतास घालवीं,
वर्षायुतीं होइल याच वैभवीं. ।
नरोगिया शत्रु वधील या बळें,
हें अष्टऐश्वर्य यया स्वयें वळे. ॥ ६ ॥

रुद्राभिषेकें निरसूनि पातक,
करील हा राज्य सुखें अकंटकें; ।

रुद्राभिषेकास्तव विप्र आणवीं,
जे पोहती नित्य शिवव्रतार्णवीं. ॥ ७ ॥

यज्ञें तपें निर्मळ चित्त ज्यांचें,
ध्यातो जिवीं पाय सदा शिवाचे; ।
त्यांच्या मुखीं तूं करवीं जपातें,
येणें महाश्रेय घडेल यातें." ॥ ८ ॥

ऐसें ऐकुनियां नृपें मग तया योगेश्वरा वंदुनी,
ते मानूनि क्रियागुरू इतरही विप्रांस बोलाउनी; ।
आज्ञापी, मग ते सहस्र कलशां सत्पल्लवीं स्थापिती,
रुद्राध्यायजपें तयाच उदकीं राजात्मजा शिंपिती. ॥ ९ ॥

## पद—( मधुमाधवी ).

ऐसें शिंपितां जीवनीं । तंव त्या सातवे दिनीं । रुद्रप्रभावें करूनी । तो राजपुत्र दचकोनी । उठिला, ते क्षणीं । मूर्च्छना आलिया सावध होउनी. ॥ १ ॥ हा शिवजप कोण्या मुखें वानावा, । चित्सुखें जीवबोधें बोधुनि जडजीवां. ॥ ध्रु० ॥ विप्रीं संरक्षिला । तो बाळ बोलिला, । 'कोणी एक पुरुष आला, । हातीं दंड न्यावया वेगें मजला । तो विक्राळ आणखी पुरुषीं ताडियला. ॥ २ ॥ पाशीं बांधोनि त्याला दुरीं तो नेलासा गमला, । तंव म्यां देखिलें तुम्हांला । संपूर्ण रक्षिलें माझ्या देहाला । शिवराम प्रभु आजि तुष्टला.' ॥ ३ ॥

ऐशी ऐकोनि त्याची वाणी । त्यासी शांतविती आशीर्वचनीं । "बा रे" मृत्युमुखांतुनी । आजि निर्विघ्नीं आलासी. ॥ २६ ॥ देखोनि आनंदला राणा, । ऋषिवरां वांटी भूरिदाना; । सारूनि त्यांचिया पूजना । दिव्य अन्ना भुंजविलें. ॥ २७ ॥ ब्राह्मण जेविले संतोषीं, । तुष्टले देती आशिषांसी । तो आशीर्वाद घेउनि निशींसी । ब्राह्मणासी बहुडविलें. ॥ २८ ॥ स्वयें बांधवांसह जेवला, । मुनीसहित सभेसि आला; । सिंहासनीं स्वस्थ बैसला । तंव येतां देखिला नारद. ॥ २९ ॥ उठोनि सभानायकांसीं । आसन देवोनि नारदासी, । नमूनि पूजा उपचारेंसीं । भावें तयासी बोलतू.

॥ ३० ॥ "नारदस्वामिया तेजोराशी, । कांहीं देखिलें असेल कौतुकासी, । तें सांगावें आम्हांसी । तुझ्या वचनासी भुकेला. ॥ ३१ ॥"

## सवाई.

"गगनाहुनि मज इथ येतां देखियलें एक कौतुक ऐका,
त्वत्सुत ग्रासुं म्हणूनचि आला अंतक तो भयदायक लोकां;
ईश्वर जाणुनि, वीर करीं त्या बांधउनी मग ताडित देखा,
जंव शिवसन्निधि ने यम स्वयें धांवत येउनि अंतकहाका. ॥ १ ॥

जोडुनि हात म्हणे यम 'जय जय वीर नमो काय करीतां,
मृत्युसि दंड विनाअपराधहि कोप करूनि शिवाप्रति नेतां;
राजसुत निजकर्मगती मरतां मजपाशिंच्च आणित होता
त्याचा तो अपराध वदा मज, ऐकोनि वीर म्हणे 'यमनाथा. ॥ २ ॥'

दश वर्ष सहस्त्र चिरायुष रुद्रजपें सकळाशुभ नाशुनि गेलें
यासि मधें मुढ आकाळि मृत्यु म्हणौनी ययासि अम्हीं दुख दीलें.
जरि संशय येथ तुझा निजहस्तक आणुनियां पुस याच रे वेळे,
पाचारुनि यम पुसतां नृपआयुष तें निज हेंचि बोले. ॥ ३ ॥

चित्रगुत बोले येउनी । 'द्वादशाब्द मुलालागुनी,' । सर्वेचि म्हणे विचारुनी । 'नांदेल भरुनी सहस्रायू. ॥ ३२ ॥ दशसहस्त्र वर्षेवरी । बाळ निर्विघ्न राज्य करी; । ऐसें आहे लेखनपत्रीं । लेखक यापरी बोलिला.' ॥ ३३ ॥ ऐकतांचि यमराज भ्याला । नमुनी वीरभद्राच्या पाउलां । प्रार्थूनि सोडविलें त्याला । घेऊन गेला यमरावो. ॥ ३४ ॥ वीरभद्र गेला कैलासासी, । राया मी आलों तुजपाशीं । आतां तुझिया पुत्रासी । निश्चयेंसीं भय नाहीं. ॥ ३५ ॥ रुद्रजपाच्या प्रभावीं । तुझा पुत्र चिरंजीवी, । सर्वांसि आनंदउनी लाववी । नारद गोसावी चालिला. ॥ ३६ ॥ नारद गेलिया स्वर्गासी । समस्त आनंदले ऋषी । गेले आपुलाल्या आश्रमासी । देऊनी रायासी आशीर्वचन. ॥ ३७ ॥ यापरी काश्मीर नृपती । रुद्राध्यायाच्या महंतीं । लंघोनि शोकअपांपती । सपुत्र भूपती सुखावला. ॥ ३८ ॥ हे शिवकथापरिपाटी । गाती ऐकती कर्णपुटीं । पापें

निस्तरोनि जन्मकोटी। आनंदें पोटीं नांदती. ॥३९॥ कथारहस्य परम पावन । वक्ता लक्ष्मीनारायण । शिवराम अंगें होऊन । निरोपण प्रकटवी. ॥ ४० ॥ गुरुकृपेचा लाघव मोठा । पिकविल्या शिवकथेच्या पेठा; । अधिकारी लुटिती यथेष्टा । नीळकंठा सुखबोधें. ॥ ४१ ॥

इति श्रीस्कंदपुराणे ब्रह्मोत्तरखंडे रुद्राध्यायमहिमावर्णन निरूपणं नाम एकविंशतितमोऽध्यायः ॥ २१ ॥

---

॥ श्रीसांबाय नमः ॥

ऐसा जो मार्ग शिवाचा मानला, । स्वयेंचि स्वयें प्रकाशिला, । संसारसक्त जिवाला । मुक्ती तत्काळ पावती. ॥ १ ॥ जे दुर्बुद्धी दुराचारी । वेदमार्ग-अनधिकारी, । स्त्री शूद्रादि आणि क्षेत्रीं । सर्व शरीरी आणखी. ॥ २ ॥ सर्वांतें करी पावन, । हा मोक्षमार्ग सर्वसाधारण; । अमर आणि जन । तिहीं अनुदिनीं सेविजे. ॥ ३ ॥ ज्या शंभूचें कथाश्रवण । संसारा करी उन्मळण । करी भवबंधसोडवण । समस्त पावन करी सद्य. ॥ ४ ॥ अज्ञानतिमिरें जे आंधळे । त्यांसी भोगवी प्रकाशसोहळे । जन्मक्षयरोगें जे गिळिले, । त्यांसी लाभलें परम औषध. ॥ ५ ॥ महापापांचे पर्वतगण । तत्वीं दारी वज्र दारुण । कर्मबीजा करी भर्जन, । सर्व साधन संपादी. ॥ ६ ॥ त्रिभुवनपावन हे कथा । भावें जो ऐके सर्वथा, । तो हे मनुष्य-लोकवार्ता । शिवचि सर्वथा निःसंशय. ॥ ७ ॥ शिवकथा जे ऐकवित । किंवा जे ऐकती सतत; । तत्प्रसादरजचि मोठें तीर्थ । ऐसें समस्त मुनि वदती. ॥ ८ ॥ येउनियां देहाचे ठायीं, । मोक्ष इच्छिती जे कांहीं; । सदा सद्भक्ति धरूनि हृदयीं । ऐकाव्या तिहीं शिवकथा. ॥ ९ ॥ नित्य ऐकतां शिवकथा । अवकाश नाहीं शिवभक्तां, । प्रत्ययीं एक मुहूर्त भरतां । पावन शिवकथा ऐकत्यां. ॥ १० ॥ प्रतिदिनीं मुहूर्तभरी । श्रवणा अवकाश नाहीं जरी, । पुण्यमासदिनीं तरी । ऐकावें तरी पुण्यतीर्थीं. ॥ ११ ॥ पुराणीं बोलिली कथा शैवी, । जो भक्त सांगे ऐके बरवी, । तो पावतां हे शिव-

पदवी । कर्मी लावी जाळोनी. ॥ १२ ॥ मुहूर्त कीं अर्ध मुहूर्तीं । पावन शिवकथा ऐकती, । त्या भक्तांलागीं निश्चितीं । कदा दुर्गती स्पर्शेना. ॥ १३ ॥ सर्व यज्ञफळ जें वर्तत, । समस्त वेदांचें जें फळित, । शिवकथा ऐकतां कदाचित । तें फळ पावत प्राणिये. ॥ १४ ॥ या कलियुगीं निदानीं । श्रवणकीर्तनावांचुनी । अन्य मार्ग नाहीं निश्चयेनीं । मोक्ष-ठिकाणीं पावावया. ॥ १५ ॥ हरिहरांचें पुण्यश्रवण । अथवा स्वानंदें कीर्तन; । हे दोनीच जनांलागुन । कामधेनुवत् फळ देती. ॥ १६ ॥ कलि-युगीं जे अल्पायुषी, । दुर्लभ श्रमती अहर्निशीं, । दुर्बुद्धी आणि दुःखवासी । धर्माच्या रोशी नातळती. ॥ १७ ॥ त्यांसी व्हावया तरणोपायो । कृपेनें बादरायणदेवो । निर्मी पुराणश्रवण हें हो । देवाधिदेवो आपण. ॥ १८ ॥ यत्नें पिउनी अमृतधार । एकाचि होईल अजरामर, । सेवितां शिवकथामृत-सार । अमर समग्र कुळ होये. ॥ १९ ॥ पुराणज्ञ जो कां भलता । बाळ वृद्ध हो तरुणावस्था, । दरिद्री हो दुर्बळता । पूजी सर्वथा सुकृतार्थ. ॥ २० ॥ जन्मगुणविशेषत । गुरूही असती लोकीं बहुत, । तयांमाजी शांत दांत । शुचिष्मंत महामेरू. ॥ २१ ॥ पुराणज्ञ ते महामुनी । बोलिले न द्यावे हेळसुनी; । जे त्यांची मुखोद्गत वाणी । फळे अनुदिनीं कामधेनु. ॥ २२ ॥ साधू सागर करुणेचा । वक्ता अध्यात्मगर्भाचा । त्याच्या मुखाची पुराणवाचा । छेदी जीवाचा संदेहो. ॥ ॥ २३ ॥ व्यासासनाच्या ठायीं । पुराणीक बैसे भलताही, । प्रसंग संपवीजे तो पाहीं । नमन कोणींही करूं नये. ॥ २४ ॥ जे अत्यंत दुष्ट दुर्वृत्त, । सभेसि जिंकावया अपेक्षित; । तयांपुढें पुराणगीत । कदापि किंचित वदों नये. ॥ २५ ॥ जेथें दुर्जनांची दाटी । शूद्र श्वापदांची अटाटी । द्यूत खेळतां हातवटी । तेथें हे गोष्टी करूं नये. ॥२६॥ सद्ग्राम संतमंडळी । सुक्षेत्र किंवा देउळीं । कीं पुण्य नदनदांजवळी । कथा विशाळी सांगावी. ॥ २७ ॥ विश्वासेंसीं सहितभक्ती । अन्य धंदा टा-कुनी निश्चितीं, । मुनि शुचिष्मंत निगुती । श्रोते या रीति असावे. ॥२८॥ कथांचा करूनि अनादर । ऐकों बसती जे अधम नर । त्यांसी पुण्य नाहीं साचार ॥ दुःख अपार जन्मोजन्मीं. ॥ २९ ॥ भगवत्कथे अनादरूनी । तांबूल घेती निरोपणीं, । ते जन्मोजन्मीं उपजोनी । होती निपटोनी दरिद्री. ॥ ३० ॥ होत असतां कथाकीर्तन, । जे ऐकतां जाती उठोन; । सर्व

संपदाअभ्युदयीं जाण । नाशती ते जन भोगामध्यें. ॥ ३१ ॥ पागोट्याचे-नि विकारें, । कथा ऐकती जे पामर । ते तंव होती रांडपोर । मस्तीखोर अभाग्यें. ॥ ३२ ॥ तांबूल पचपचीत पामर । भगवत्कथा ऐकती जे नर; । त्यांसी स्वविष्ठा दुर्धर । यमकिंकर चारिती. ॥ ३३ ॥ तुरंगीं बैसुनियां देख । कथा ऐकती जे दांभिक । भोगूनियां अक्षयी नरक । शेवटीं काक ते होती. ॥ ३४ ॥ जे बैसोनि वीरासनीं । अथवा चढोनि उंच स्थानीं । कथा ऐकती उदासिनीं । ते वृक्ष होउनी उपजती. ॥ ३५ ॥ प्रणमन करूनि वक्तयासी । कथा ऐकती मस्तीसीं । ते विषधर होती अनायासीं । पापें त्यांचीं जहालीं. ॥ ३६ ॥ जे निजोनि कथा ऐकती, । ते तों अजगर स्वयें होती । कथे माजी निद्रा घेती । ते पाषाण होती पर्वतीं. ॥ ३७ ॥ प्रतिष्ठे टेकोनि मृदोळिक । जे कथा ऐकती मूर्ख, । ते गुरुतल्पकाचें पातक । पावोनि नरक भोगिती. ॥ ३८ ॥जे वक्तयातें निंदिती; । शिवकथेसी उपहासिती । ते तों जन्मोजन्मीं शतीं । शुनक होती निंदक. ॥३९॥ चालतां कथेचे परिपाठीं । जे बोलती फाकट गोष्टी, । ते गर्दभ होती शेवटीं, । दुःख पाठीं भोगित. ॥ ४० ॥ हरिहरकथा मनोहर, । भेदेंकरूनि ऐकती नर; । ते नरक भोगोनि घोरांदर । रानडुकर मग होती. ॥ ४१ ॥ कथा होती स्वानंदेंकरुनी, । जे संतोष न पावती दुरुनी; । ते नायकती कांहीं श्रवणीं । यमभुवनीं नांदती. ॥ ४२ ॥ कथा होतां मनोहर, । माजी विघ्न कारिती नर । ते नरक भोगोनि महाघोर, । ग्रामशूकर मग होती. ॥ ४३ ॥ सद्भावें ऐकत्यांप्रती, । भगवत्कथा जे वाखाणिती । त्यांसी ब्रह्मपदीं होय वस्ती । कल्पसमाप्ती शतकोटी. ॥ ४४ ॥ शिवभक्त पुराणिकालागुन । आसन, पर्यंक, कंबलाशयन, । पटकुळ अर्पिती भावेंकरून, । नाना भूषणें आवडतीं. ॥ ४५ ॥ तो स्वर्गलोका जाउनी । तेथें अपेक्षित भोग भोगुनी, । मग ब्रह्मपदीं चिरकाल नांदुनी । अंतीं चिद्घनीं प्रवेशती. ॥ ४६ ॥ जे महापापी ये लोकीं । अन्यही जे उपपातकी, । ते भगवत्कथाश्रवणेंच कीं । हरिहरलोकीं नांदती. ॥ ४७ ॥ येविषयीं एक सांप्रती । इतिहास सांगों तुम्हांप्रती, । ऐकतां निवे मनोवृत्ती । श्रवणीं भक्ती बहु वाढे. ॥ ४८ ॥ दक्षिणदेशमध्यपंथीं । बाष्कळ ग्राम होतें क्षितीं । तेथील लोक मूढमती । स्वप्नींही नेणती स्वधर्म. ॥ ४९ ॥

दुराचार ते ब्राह्मणाची मिराशी,
सदा पाठिमोरे श्रुतीसी स्मृतीसी; ।
जपध्यान, संध्याहि वारेंचि नाहीं
परस्त्रीविशीं लालुची सर्वदाही. ॥ १ ॥

कृषीवलें शस्त्रधरें गयाळें,
निर्दैव दुष्टें कपटी दुशीळें; ।
विज्ञान वैराग्य स्वरूपधर्मा,
नेणोनि कामीं रतती कुकर्मा. ॥ २ ॥

स्त्रिया पापकारी जशा स्वैरिणी त्या,
सदा कामिका वल्लभू नावडे त्यां; ।
व्रताचार नाहींच कौटिल्यशीला,
मतीहीन त्या कर्कशा सर्वकाळा. ॥ ३ ॥

पद—( चाल गोविंद गे माय गोपाळ गे ).

तों तेथें विप्र एक नामें विदुर पाहीं, । लोळत पडलासे नित्य वृषली-गेहीं; । वर्जिली स्त्री तयाची तेणें रूपलावण्य देहीं, । नाना विलास दावी ते तों नावडती तया कांहीं. ॥ १ ॥ तो महादुष्ट ऐसा नित्य दुष्कर्म-कारी, । शिश्नोदराचिलागीं नित्य व्यवसाव करी. ॥ ध्रु० ॥ तों सती त्या द्विजाची काम न साहे अंगीं । जार एक मिळविला नित्य तयासी भोगी । विदुर अवचटें देखे तयां दोघां संभोगीं । धांवला जों धरावया जार पळाला वेगीं. ॥ २ ॥ बायको सांपडतां घोळघोळुनी मारी । ते म्हणे "मारिसी कां तुझा खेळ बाहेरी । मग गति काय ऐशी राहूं तरुणा नारी." ॥ ३ ॥ वक्ता तो होय तीसी, 'हित एक सांगेन, । घेउनि द्रव्य त्याचें त्यासी रती देऊन । तें धन घेउनियां मज देई वो आणून । आयतें नेउनियां तिसी देईन, । येणेंचि नित्य काम पुरउनियां घेई.' । ऐकोनि योषिता तेणें ती जारिण ख्यात झाली, । पूर्ण शिवरामदेहीं विसरुनी भ्रष्टली, । तों कितेक दिवस होतां विप्र नाशला तोही. ॥ ४ ॥

तो काळें मृति पावतां स्वपुरुषीं निःशंकते जाहली,
तेथें जारसुतांसवें बहुदिनीं जारत्वि ते राहिली,
काळें ते गतयौवना अवचटें जाणोनि शैवी तिथी
गेलीसे निजबांधवांसहित ते गोकर्णठायाप्रती. ॥ ४ ॥

## सवाई.

स्नान करूनिच तीर्थजळीं तंव तेथुनि चालिली मोहरी ते,
कोणि एके शिवालयिं होत पुराण तिथ बैसत श्रवणातें;
तेथ निरोपण तेंच निघे यमकिंकर नेउनि जारसतीतें,
ताउनि लोहपरीघ तिचे स्मरमंदिरीं चालविती नरकीं ते. ॥ १ ॥

हे श्रवणीं पडतां गिर भेदुनि पूसत त्याचि द्विजासि रहस्यें,
"श्रीगुरुजी, मज नेणत पाप अनंगबळें कुटिलें घडलेंसे.
येथ पुराणसुगोष्टिस ऐकुनि त्या भयिं हे तनु कांपे विशेषें,
होतजळो अघ आचरलें, असें इंद्रियां पोषुनि कामविलासें. ॥ २ ॥

अल्पचि देहसुखार्थ महा अतिघोरचि दुर्गतिमाजि बुडालें,
मी मरणावसरीं यमकिंकर केंवि विलोकुं मुखें विकळें,
बांधुनि नेति गळां दृढ पाश धरूं धिर केंवि जिवीं चिरकाळें,
ताडिति तोडिति साहूं कशी मज जाळित देह हुताशनजाळें. ॥ ३ ॥

## पद.

स्वामिजी देवदेवा, पापें आचरलें अद्भुत । तेणें दुःख भोगावया घडिभरी नाहीं उसंत ॥ ध्रु० ॥ लक्ष कोटी यात्रा कृमिकीटांठायीं । हिंडहिंडोनियां मी शिणेन देहीं । जेवणें खाणेंही मज गोड वाटेना कांहीं. । रात्रीं डोळां निज नये दुःखें व्यापिलें पाहीं. ॥ १ ॥ दुख तें आठवितां हृदय हें फुटे, । देवा रे मज पाहीं घातलें कोठें ? । शूळीं देणें कडालोटीं येणें दुःख जें घटे । निरयाच्या यातना आणि त्या भोगें शतगुणी मोठें. ॥ २ ॥ मरमर ज्या केल्या पापांचिया राशी, । अश्वमेध करूनियां शमन नव्हे त्यांसी, । शत गंगा न्हालें जरी शुद्धी नव्हे मानसीं ।

कैसें आतां काय करूं शरण जाऊं कवणासी. ॥ ३ ॥ नरकसिंधुमाजि आजि बुडतया मातें, । कोण तो येऊनि तारील येथें ? । तारक तूचि मज, आलें शरण मी तूतें । माय बाप इष्ट गोत तूंचि आम्हां दीनांतें. ॥ ४ ॥ आश्रयो मज दुजा तुजवीण नाहीं, । तूं जरी टाकिसी भरले प्रवाहीं । सर्व भावें विश्वासलें पूर्ण मी तव पायीं; । शिवरामा धरावें मज उचलोनि बाहीं. " ॥ ५ ॥

ऐशी जिवीं ते अनुतापली बरी,
मौळी समर्पी चरणांबुजावरी; ।
द्विजें कृपेनें उठवूनियां तिला
देऊनियां निर्भय काय बोलिला. ॥ ९ ॥

"सर्वही पापांचे वृंद । पश्चात्ताप निरसी सद्य, । पश्चात्तापें नर प्रबुद्ध । होत विशुद्ध सर्वथा. ॥ ५० ॥ पंचगव्यादि विधानें । प्रायश्चित्तें केलीं अगण्यें, । पश्चात्तापी नसे जों मनें । तो न पावणें सद्गती. ॥ ५१ ॥ म्हणोनि सत्कथाश्रवणीं । संतांचें सेवितां पायवणी, । पुण्य क्षेत्रीं राहतां अनुदिनीं । होय तत्क्षणीं चित्तशुद्धी. ॥ ५२ ॥ सत्कथाश्रवणाभ्युदयें । चित्त जैसें निर्मळ होय, । तैसें नाना साधनोपायें । उत्तम नये गती होता. ॥ ५३ ॥ घडिघडी शोधितां जाण । सोज्ज्वळ होतां दर्पण, । तेवीं मनेंसीं श्रवण । होय मन अति शुद्ध. ॥ ५४ ॥ चित्त जेव्हां निर्मळ होय । शिवध्यान तेथें राहे, । ध्यानें त्रिविध कर्म देहें । प्राप्त होय शिवपदवी. ॥ ५५ ॥ यालागीं समस्त पुण्यावरी । कथाश्रवणाचीच आहे थोरी, । श्रवणें ध्यानें थोर अंतरीं । तरी वरी कैवल्य. ॥ ५६ ॥ सिद्ध नाहीं ज्ञानघन । जैसा करी श्रवण; । तो अन्यजन्मीं लाहे निधान । शिवठिकाण तो लाभे. ॥ ५७ ॥

## चामरी.

नाममात्रें अजामिळ । जिंकोनियां कळिकाळ । पश्चात्तापें श्रीगोपाळ । ध्यानगतीं पावला. ॥ सर्वहि श्रेयाचें सार । सत्कथाश्रवण थोर । तद्विहीन जो पामर । केविं जाय सुटला ? ॥ याचिलागीं तूं अपूर्व । विषय गाळूनियां सर्व । सत्कथा ऐकोनि शर्व । धरी जीवीं आपुल्या तेणें पाखाळेल ।चित्त । शिव सांबातेंचि ध्यात । येचि जन्मीं आहे मुक्त ।निःसंदेहो तुजला." ॥ १ ॥

## पद.

ऐशी ऐकतांचि वाणी । कंठ दाटला, बाष्प लोचनीं; । त्याचे पदपंकज वंदुनि । कृतार्थ आपणा मानी. ॥ १ ॥ तेणें उद्धरिली ते योषा । चित्तीं बैसला ध्यान ठसा. ॥ ध्रु० ॥ त्याच क्षेत्रीं द्विजदयाळें । ज्ञानवैराग्यभक्तिसमेळें । शिवपुराण प्रबोधियलें । सर्व विषयवासना गळाली. ॥ २ ॥ जेणें वैराग्य फार उपजे, । आणि शिवस्वरूप समजे । मन मुरडोनी तेथें निजे । तैसें बोधी द्विज सहजें. ॥ ३ ॥ ध्यान जों जों मनीं वळकावे । तों तों रजतममळ नाश पावे, । मग शिवस्वरूप सावेवें । चित्तीं गेलें बिंबोनि निजभावें. ॥ ४ ॥ गुरुपदरज आश्रयोनी । पूर्ण गिरीश जनीं वनीं । शिव ध्यायिला आपण मनोमनीं । मग्न शिवरामप्रभु चिद्घनीं. ॥ ५ ॥

नित्य तीर्थजळीं स्नान करूनियां,
जटा वल्कला भूषणा धरूनियां, ।
भस्मउधळण अंगीं धरूनियां,
दिव्य रुद्राक्ष अळंकारुनीयां ॥ ६ ॥

शिवनामजपीं ते रातली गा,
बद्ध पद्मासनीं शिवा पातली गा; ।
मौनीं चित्‌शंभुतें लागली गा ।
करी श्रवणमनन चांगली गा. ॥ ७ ॥

धरी सद्गुरूचे पाय झटकरी,
सर्व संबंध तोडिला तटकरी; ।
पूर्ण सद्गुरुबोध सटकरी, ।
शिवरामासी तोषवी चहूं करीं. ॥ ८ ॥

## पद.

विश्वेश विलय स्थिति जन्मादि विश्वैकविलय शिववंद्या । विध्वस्तकाळभय, वीतगुण, कल्पनाभास निगमागमलोकवेद्या ! ॥ १ ॥ देव दे मला करुणाकटाक्ष शंभो, । मायामय पाश नाना खंडुनि मूर्ति तुझीच मजमाजि बिंबो. ॥ ध्रु० ॥ स्वच्छ रजनीशकृतशेखरा शांत सुरवरार्चितदिव्यपादपद्मा, । गंगाधरा हिममयभूषणा, भक्तार्तिनाशना, प्रकट शैलें.

द्रसद्मा; ॥ २ ॥ पूर्ण करुणार्णवा, अखिलभूतनाथा, धृतशूल भुवनत्रयगीतकीर्ते । श्रीनीलकंठ मदनांतक उमापते भक्त शिवराम प्रेममूर्ते. ॥ ३ ॥

विप्रांगना ते निजईश्वरासी
भक्तीसुखें प्रार्थित नित्य ऐशी; ।
शैवी कथा ऐकत आत्मबोधें ।
जाली निराळी गुणकर्मबंधें. ॥ ९ ॥

त्यानंतरें काळवशें तनूतें,
त्यजी सवें ते शिवभक्त तेथें; ।
येऊनियां भूषविती तियेतें,
नेली विमानीं शिवमंदिरातें. ॥ १० ॥

पद.

तेथें शिवमूर्ती देखे सेविजेत सुरांनीं । नंदी भृंगी गणेशादि प्रमथगणांच्या हारीं; । सभोंवते उपासिती शोभे वामीं गौरी, । कोटिसूर्यसम शोभा पाहतां सुखावली नारी. ॥ १ ॥ धन्य धन्य वंजुळा ते शिवरूप न्याहाळी । शिवसुखी मग्न झाली तोडुनि गुणकर्मजाळी. ॥ ध्रु० ॥ कैलासीं त्रिलोचन पंचमुखी नीलग्रीव । देखतां निवाली ते, चिदानंद सदाशिव । वंदिला सर्व भावें, झाला आनंदाविर्भाव; । प्रेमोदक नेत्रीं हृदयीं भरला महादेव. ॥ २ ॥ शिवभक्ति त्या दोघांनीं सन्मानिली करुणेनी, । त्या दोघां एकरूपीं पाहती अद्वयलोचनीं । आपणा भुलली ते बाळा पूर्णानंदघनीं । प्रकाशें स्मरली शिवरामीं अनुदिनीं. ॥ ३ ॥

कदाचित त्या कैलासशिखरीं । वंजुळा आली वृत्तीवरी । एकांतीं येउनि गौरी । वंदूनियां पुसती. ॥५८॥ "माय कोठें आहे माझा भर्ता" । ऐकोनि बोले जगन्माता । "तुझ्या पतीनें नरकावस्था । अपरमिता भोगिल्या. ॥ ५९ ॥ शेवटीं विंध्यपर्वतीं । पिशाच झाला हे प्रतीती." । बाळा गौरीसी पुसे मागुती । पावेल सद्गती तो कैसा ? ॥ ६० ॥ मग शिवा बोले हरिखें । "तो शिवपुराण जरी ऐके । तेणें नरक निस्तरोनि अशेख । ये-

यील देख या लोका." ॥ ६१ ॥ ऐकोनि ऐसें उमेचें वचन। विनयें प्रार्थी कर जोडुन। पतिदुर्गतिविमोचन । माय कृपेनें करावें. ॥ ६२ ॥ यापरी वडिघडी प्रार्थितां। कृपेनें द्रवली जगन्माता। तुंबरू पाचारिला सेवगता। त्यासी मुखता स्वयें बोले. ॥ ६३ ॥ तुंबरा, जाय विंध्याद्रीसी, । सवें विमानीं वंजुळेसी । तेथें इचा पती पापराशी। बहुत दिवशीं विचरतु. ॥ ६४ ॥ त्यापुढें गाय शिवकथेसी, । जें संयुक्त सद्गुणेंसीं; । निवारुनी त्याच्या दुर्गतीसी। शिवलोकासी आणावा. ॥ ६५ ॥ ऐशी आज्ञा आयकोनियां। तुंबर, नारदाचा पथिया, । तिसी विमानीं बैसउनीयां। विंध्यालया चालिला. ॥ ६६ ॥ विंध्यपर्वता येउनी पाहे। तेथें एक पिशाच्च उभा आहे, । हांसे रडे विळगताहे; । आक्रोशें पाहे तयातें. ॥ ६७ ॥ विक्राळ दाढा हनुवटी । नेत्रीं शूळाप्रमाणें दाटी; । देखतां तुंबर उठाउठीं। दैत्य हटीं आकळिला. ॥ ६८ ॥ बांधोनि घातला आपणाजवळी। तुंबुरु गंधर्व कळवळीं। वीणा घेऊनि करकमळीं। गाय मंजुळीं शिवकथा. ॥ ६९ ॥ क्रमें गौरीशिवकथा । सातदिनीं सहज ऐकतां। सकळ पाप क्षाळुनी तत्वतां। पिशाचता नाशली. ॥ ७० ॥ तत्काल दिव्यरूपधरी। शिवमहिमा जाणोनि अंतरीं । आपणही शिवकथा सादरीं । आनंदें गातसे. ॥ ७१ ॥ स्त्रियेचा मानुनी उपकार । हृदयीं आलिंगिली सुंदर, । स्वानंदें वंदिला तुंबर। केला उद्धार म्हणोनि. ॥ ७२ ॥ बैसोनि त्याच विमानीं। शिवचरितें गात अनुदिनीं। तुंबरासहित ठिकाणीं। तेच क्षणीं पावला. ॥ ७३ ॥ सूत म्हणे हो ऋषेश्वरा । हे शिवकथा अति मनोहरा, । पापतापा करी संहारा। प्रीति करा भगवंतीं. ॥७४॥ आत्मज्ञानाचें धन्य शोधन। ऐकती वाचती हें आख्यान। ते सर्व संपदा सुख भोगून। शिवठिकाण पावती. ॥ ७५ ॥ श्रीशंभूचें गुणकथन । परमानंद उपजवी पूर्ण। भवरोगाचें औषध जाण। परम पावन शिवकथा. ॥ ७६ ॥ तुम्हीं आइकिलें सद्भक्तीं। यालागीं कृतकृत्य जालेती। जे शिवकथामृत सेविती। ते देव होती देवांचे. ॥ ७७ ॥

ते जन्मभाजः खलु जीवलोके येषां मनो ध्यायति विश्वनाथम् ।
वाणी गुणान्स्तौति कथां शृणोति श्रोत्रद्वयं ते भवमुत्तरंति. ॥ १ ॥

ध्याती जे हृदयांबुजीं दिनदिनीं श्रीविश्वनाथा शिवा,
ज्याची जीभ सदैव गायन करी शंभूकथालाघवा; ।
ज्याचें श्रोत्र अपूर्व त्या शिवकथा अत्यादरें ऐकती, ।
संसाराब्धि तरूनि तारुनि जना ते धन्य झाले क्षितीं. ॥ १ ॥

ब्रह्मोत्तरखंडीचें निरूपण । पूर्णानंद वक्ता जाण, । शिवरामाचें निमित्त करून । चालवी असाधारण शिवकथा ॥ ७८ ॥

॥ इति श्रीब्रह्मोत्तरखंडे शिवमहात्म्ये स्कंदपुराणे शिवकीर्तन निरोपणं नाम द्वाविंशतितमोऽध्यायः ॥ २२ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥